# ३२

# उत्तरकालीन पेशवे—कौटुंबिक राहणी

[किंमत—२ रुपये ५ आणे किंवा ४ शिलिंग ३ पेन्स]

संपादक—गो. स. सरदेसाई, बी. ए.

गव्हर्न्मेंट सेंट्रल प्रेस, मुंबई
१९३३

# THE PRIVATE LIFE OF THE LATER PESHWAS

This selection is arranged on the model of a preceding one (No. 18) which dealt with the private life of King Shahu and his Peshwas. Personal details about historical characters are always valued by students of history. The record of what may appear to the superficial observer to be trivial incidents, often provides clues to motives and characters of a more intimate nature than formal accounts. To supply this demand, papers more or less of a personal nature are here brought together under the following heads for convenience of study :—

1. Social and ceremonial, Nos. 1–25 ;
2. The Ganapati festival, Nos. 26–30 ;
3. Education, sport, travel, Nos. 31–55 ;
4. Domestic animals, Nos. 56–68 ;
5. Ornaments and jewellery, Nos. 69–113 ;
6. Gopikabai at Gangapur, Nos. 114–143 ;
7. Illness and death of Madhavrao I, Nos. 144–160 with charities made by Ramabai, 190–192 ;
8. Raghunathrao and Madhavrao II, Nos. 161–199 ;
9. Vows, buildings, etc., Nos. 200–213 ;
10. Fire at Shanwar Wada, Nos. 214–223 ;
11. Bajirao II, palaces and gardens, Nos. 224–227.

The papers need hardly any introduction ; they are mostly short and simple and occasionally most entertaining. A discriminating reader will at once detect in them the sharp contrast in the tastes and habits of the different members of the Peshwas' family. While the puritanical Madhavrao I refuses to wear gaily coloured clothes, his uncle Raghunathrao writes for a supply of pretty and well-trained dancing girls ! Apart from such details, however, one is sorry not to come across more matter illustrating the every-day life of the later Peshwas. Thus one would like to know, for instance, what sort of education men and women usually received at that time. The ladies of the Peshwas' family were certainly able to read and write. Sagunabai, who became a widow at the age of ten, seems to have devoted her later life to reading and studying books of epic literature and philosophy, if the long list (No. 42) of manuscripts in her possession at the time of her death can be taken as an indication of her real tastes. A wife of Bajirao II is mentioned as practising handwriting at the age of ten or thereabout, a fact which justifies the inference that the ladies were required to practise reading and writing regularly. Madhavrao even in the midst of a distant campaign is never tired of attending to various details concerning the improvement of the city of Poona, such as the construction of buildings, tanks and water-channels. He is also strict and punctual as regards financial matters. Ali Bahadar,

the grandson of Mastani, although of Mussalman religion, was given Marathi tutors and was brought up exactly like other members of the Peshwas' family. Ladies were given every facility for performing pilgrimages, particularly to distant places like Benares and other holy places in northern India. Brahmin widows are prohibited, says one paper, from adopting a son and heir and the sale of Brahmin girls in marriage is also forbidden (206). Adultery was punished with loss of caste. Wrestling, elephant-fighting, cheeta-hunting, falconry and feats of horsemanship are some of the most popular sports in which the Peshwas and their associates usually indulged. Temples were plentifully constructed and the art of stone-carving seems to have reached great perfection. Painting and decoration were cultivated to a large extent, but portraiture appears to have been introduced at the Peshwas' Court through the instrumentality of Sir Charles Malet, the first British Resident at Poona. Telescopes, watches, cups and saucers, broad-cloth and other fancy articles seem to have been largely imported from Europe. Sadashivrao Bhau is mentioned incidentally as having successfully combated the evil of intoxicating drinks (206). Altogether the papers afford us a picture of the social and religious life of the Peshwas, which, though not perfect, is still of inestimable value to students of history.

No. 2]

श्री

तीर्थरूप राजश्री नाना ता॥

राजश्री भाऊ स्वामींचे सेवेसी

अपत्यें त्रिंबक सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता॥ छ २१ मानाणपर्यंत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे विशेष. स्वामींनी राजश्री स्वामींकारणें नारळीची रोपें ४७ सतेनालीन व धनीनीचे बंगलीयाचे संदल्याकारणें पारनेरच्या चुन्याच्या हिरव्या कल्या तीन मण पाठविल्या त्या पावल्या. चुन्याच्या कल्या गुजरलियावर धनीन काय भाषण करितील ते लेहून पाठवणे म्हणून आज्ञा. तर चुना गुजरानून काय बोलतील तें सेवेसी मागाहून लेहून पाठऊ. विदित जाले पाहिजे. नारळीची रोपें राजश्रीस गुजरानू आणि मागाहून लेहून पाठऊ. विदित जाले पाहिजे. सुपारीची रोपें काही पाठवावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Nana Purandare acknowledges receipt of some articles sent by the Peshwa for the king Shahu and his Queen.*

Bk Ca 24—1 5045

No. 3] [?

श्री

राजश्री पंतप्रधान
गोसांवी यांसी

•॥छ

श्रीमंत सद्गुणनिधान कृपाविधान प्रतापवरिष्ठाभिधान निरंतरभगवदनुसंधान सावधान श्नो माहाराव जानोजी जसवंत निंबाळकर दंडवत विनंती उपर. येथील क्षेम तार छ २९ जाखर मुा कमलालये जाणोन निजानंदलेखन कीजे विशेष. सांप्रत आपल्या व रा। भाऊसा। व राजश्री रघुनाथराऊजीच्या चरण पुसावयास धोत्रजोडे तीन पाठविले आहेत. येक दिवस यासी चरणस्पर्श करून तदुत्तर ज्यास कृपा करून देणे त्यास दिधले पाहिजे. विशेष लिहिणे हेच विनंती.

¶*Janoji Nimbalker sends three pairs of dhotees for the Peshwa, Sadashivrao Bhau and Raghunathrao. The letter is written in his characteristic ornamental style.*

---

No. 4] [3-2-1762

श्री

तालीक.

प्रभुवर्य श्रीमंत राजश्री दादा यांप्रति गंगाधरभट व रामशास्त्री आसीर्वाद विनंती. येथील क्षेम ता। माघ शुध नवमीपर्यंत स्वामीच्या कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. श्रीमंत नारायेणराव यांच्या मौंजीचा विचार करावा म्हणौन पत्र आले, त्यावरून ब्राम्हणसभा करून विचार पाहाता यंदा जेष्ट मासी येक तिथि आहे. परंतु प्रथमांध व अष्टम ब्रहस्पति अभुक्त भोग याप्रो सप्तम वरशाचा प्रकार चौर्‍यासीच्या श्रावणा वरशापासून पंच्यासीच्या श्रावण मासपर्यंत अष्टम वर्श. त्यांस फाल्गुण व चैत्र व वैशाख या ती महिनियात मौंजीच्या तिथी आहेत. अष्टम वर्श ब्राम्हणांस मुख्य काल, अष्टम ब्रहस्पतीहि भुक्त भोग होतो. यां(त मुहू)-र्त लाभतात. पंच्यासीचे चैत्रामध्ये मिनीचा सूर्य आहे यास्तव प्रशस्थ आहे. ब्रहस्पति अष्टम तरी यंदा जेष्ट मासीहि आहे. आणि पंच्यांसीच्या वैशाख वद्य चतुर्थीपर्यंत अष्टमच. वैशाख वद्य चतुर्थीपुढे नवम ब्रहस्पति होतो. होतांच अस्तंगत होतो. यास्तव पुढे मुहूर्त नाही. याप्रमाणे मुहूर्ताचा विचार वेदशास्त्रसंपन्न राजश्री गोविंद दीक्षित व तथा राजश्री धोंड जोसी श्रीवर्धनकर प्रमुख पंडित गणक यांचे विचारे.

¶*Gangadhar Bhat and Ramshastri give their opinion about the auspicious day for the thread-ceremony of Narayanrao.*

No. 5] [10-2-1762

पौ छ २३ रजब.

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री गंगाधरभट
व रामशास्त्री स्वामीचे सेवेसी

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. चिरंजीव राजश्री नारायेणराव याच्या व्रतबंधाच्या मुहूर्ताचे प्रकार विस्तारे लिहिले ते सविस्तर कळले. त्याशास, मातुश्री बाईजवळ येतद्विषईचा अर्थ सांगावा. त्यांच्या व तुमच्या विचारे निश्चये होईल तो आम्हास लेहून पाठवावा. त्यांच्या व तुमच्या विचारे होईल तोच विचार आमचा आहे. रा छ १५ रजब. बहुत काय लिहिणें ? तुम्ही जो निश्चये कराल तो आम्हास मान्य आहे. लौकर थोड्यात गुंता उरकल्या तरी उत्तमच आहे. हे विनंती.

¶*Raghunathrao requests Gangadharbhat and Ramshastri to fix, in consultation with Gopikabai, and let him know the auspicious day to celebrate the thread-ceremony of Narayanrao.*

---

No. 6] [After 28-9-1764

श्री

चिरंजीव राजश्री नारायेणराव यांसी प्रति सौ पार्वतीबाई कृतअनेक आसीर्वाद. उपरी, येथील क्षेम जाणोन आपणाकडील निरंतर सविस्तर वृत ल्याहावे. स्वहस्ते पत्र ल्याहावे. वरकड तुम्ही गेलियापासोन अद्यापि कांहीच पत्र लिहीत नाही हे अपूर्व असे. यानंतर चिरंजीव सौ रमाबाई यांसी आस्विन सुध सुक्रवारीं त्रितीयेस रजोदर्शन प्रात जाले. हे पुत्रलाभ आनंदाचे वृत तुम्हास कलावे म्हणोन लिहिले असे. वरकड तुम्ही तेथे मैवासगिरीत[1] न राहावे. वडिलांचे पायांसीं येकनिष्ठेन असावे. वडिलांचे सेवेस अंतर न करावे. आज्ञेप्रो वर्तणूक करावी. कलावे, बहुत काय लिहिणे, हे आसीर्वाद. सर्व मंडलीस आसीर्वाद. सर्वांनी आपआपले कार्यभागी उतम रीतीने राहावे. * * * प्रकारे वर्तावे. अंतर न करावे. * * * *

¶*Parvatibai writes to Narayanrao asking him to be of good behaviour and to remain obedient to the elders.*

---

१ पुंडपणांत.

No. 7] [24-6-1765

पौं छ ९ मोहरम सन
सीत आशाढ मास.

श्री.

श्रीमंत राजश्री दादासाहेब स्वामीचे सेवेसीं

आज्ञाधारक सिवाजी बलाल चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार कृतानेक विज्ञापना. ताा छ ९ मोहरमपर्येंत स्वामीचे कृपावलोकनेकरून मुकाम असी येथे क्षेमरूप जाणून स्वकीय लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीचे आज्ञापत्र छ २९ जिल्हेजचे सादर जाले. तेथे आज्ञा की, चिरंजीव सौभाग्यवती रमाबाई यांचे गर्भाधान अशाढ शुध्ध नवमी गुरुवारी कर्तव्य आहे. तरी तुम्ही सहकुटुंब येणे म्हणून आज्ञा. आज्ञेप्रमाणे निघोन यावेच. परंतु प्रजन्यकाल, मार्गी नद्या बहुत. गुरुवारीं येऊन पोहचावे. स्वामीचे आज्ञापत्र छ ४ मोहरमी रविवारी च्यार घटका रात्रीस सादर जाले. पुढे अवकाश मध्ये तीन दिवस. मुहूर्ताचे दिवसी स्वामीजवळ प्रविष्ट व्हावयास अवकाश नाही यास्तव. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Shivaji Ballal, writing to Raghunathrao, regrets his inability to attend the consummation ceremony of Ramabai, which was to come off on 27th June 1765, as he got the invitation rather late.*

---

No. 8] [25-1-1763

श्री.

श्रीमंत माहाराज सौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेब याणी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान यासी आज्ञा केली ऐशीजे. तुम्ही विनंती पत्र पाठविले ते पाऊन लिहिले वर्तमान कलले. तिळशर्करा पाठविली ती प्रविष्ट होऊन स्वीकार केली. याचप्रमाणें निरंतर विनंतीपत्र पाठऊन अपलेकडील वर्तमान लिहीत जाणें. राा छ १० रजब. बहुत लिहिणे तरी सुज्ञ असा.

*¶The Satara (or Kolhapur ?) Chhatrapati's Queen accepts the Sankranta greetings sent by the Peshwa Madhavrao Ballal.*

*No. 9*]

पौ छ १४ रजब

सु॥ अर्बा सितैन.

### श्रीमार्तंड.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान

स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक मल्हारजी होळकर कृतानेक विज्ञापना. येथील कुशल ता॥ छ ३ माहे रजबपावेतों येथास्थित असे विशेष. राजश्री वासुदेव शामराज याज-समागमें वस्त्रें ता॥ शादि सनगें ना॥

| | | | |
|---|---|---|---|
| १ तिवट आल | १५० | १ सिनस्याप | ३०० |
| १ सेला जाफरखानी | २०० | १ मामुदी जरी | १२० |
| १ पातळ पैठणी | २०० | १ चोळखण चौकडी | १३ |
| ३ | ५५० | ३ | ४३३ |
| ६ | | | ९८३ |

एकूण सा सनगें, नवसेंत्र्यायशीं आलीं. कृपा करून पाठविलीं ते स्वीकारलीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*Malharrao Holkar acknowledges the receipt of some dresses sent as a present by the Peshwa on the occasion of a marriage.*

---

*No. 10*] [*1-12-1764*

पौ छ २० जाखर

खमस मार्गशीर्ष.

### श्री.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी

जनार्दन स्वामी गोो

पोो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत जाणें विशेष. चिरंजीव सौ रमाबाईस कर्नाटकांत न्यावयाकरितां आणावयास रा पांडुरंग कृष्ण याजबरोबर उंटे व तटे घोडी देऊन

---

१ केशरी. २ जरतारी.

पाठविले आहे. तरी आणिखी सरंजाम लागेल तो तुम्ही तेथून देऊन रवानगी करणे. रा छ ७ जमादिलाखर सुा खमस सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao writes to Nana Fadnis about the arrangements to be made to send Ramabai to her husband, the Peshwa, who was at this time in the Karnatak.*

---

*No. 11*] [*30-12-1764*

पो छ ११ रजब सन

खमस पौष मास बा कासीद.

**श्री.**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी**

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. चिरंजीव सौ रमाबाईस आणावयासी रो पांडुरंग कृष्ण गडबोले व राजश्री गोविंद सिवराम याजकडील स्वार पाठविले आहेत. त्यास, रमाबाईचे शरीरास किंचित पीडा उपद्रव जाहाला आहे, पाये दुखतो, म्हणौन तुम्ही लिहिले. त्यास, तूर्त आणावयाचे प्रयोजन नाही. स्वार व पांडुरंग कृष्ण यासी पाठऊन देणे. रा छ ६ रजब. हे विनंती.

¶*Raghunathrao writes to Nana Fadnis that the plan of sending Ramabai to the Karnatak is, for the present, cancelled as she was suffering from some pain in her leg.*

---

*No. 12*] [*16-1-1765*

पौ छ ९ साबान खमस

माघ बा सांडणीस्वार.

**श्री.**

**राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी**

विनंती. उपरी, तीर्थस्वरूप सौभाग्यवती पार्वतीबाई व मातुश्री सगुणाबाई यांजकडे शागीर्दपेशाचे लोक खिजमतगार वगैरे आहेत, त्यांस कापड पावले नाही. त्याजवल गवगवा करितात म्हणौन कळले. त्यास, खिजमतगारांचे कापड द्याव-

याविसीं तुम्हांस पेशजी लिाच आहे. त्याप्रों दिल्हेच असेल. सारांश गोष्ट, त्याजकडे माणसें आहेत त्यांचें कापड वगैरे कार्याकारण असेल ते देत जाणे. फिरकोल गोष्टीचा बोभाट नसावा. तुम्ही करीतच आहां; परंतु येथे ऐकिले त्यावरून लिहिले असे. रा छ २३ रजब. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to see that clothing due to the servants of Parvatibai and Sagunabai is given to them and mildly hints that complaints in such petty matters should not arise.*

---

*No. 13*] [*4-2-1765*

पो छ * रमजान

सन खमस फाल्गुन.

**श्री.**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी**

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. चिरंजीव सौ रमाबाईस आणावयासी पेशजी रो पांडुरंग कृष्ण पाठविले आहेत. त्यास, हाली येथून रो रखमाजी आइतोले पथकसुधा व ओझ्यास उंट नफर आठ यैसे पाठविले आहे. तर बराबर साहित्य डेरा वगैरे देऊन व पांडुरंग कृष्ण समागमे देऊन सौ रमाबाईची रवानगी सत्वर करणे. रा छ १२ साबान. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao writes to Nana Fadnis to make arrangements for taking Ramabai to Karnatak.*

---

*No. 14*] [*1-9-1766*

पो छ २९ रोविल सन सब्बा.

**श्रीशंकर.**

**चिरंजीव राजश्री माधवराव यांप्रति स्नो**

आनंदीबाई आशीरवाद उपरी. येथील कुशल ता छ १८ माहे रबिलावल जाणोन येथास्थित असे विशेष. तुह्मीं पत्र पाा ते पावले. लिहिला मजकूर कलो आला. राजश्री बालाजी जनार्दन यांसी लिहिले होते, त्यावरून तुम्ही कापड पाठविले ते यादीप्रमाणे पावले. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

¶*Anandibai acknowledges receipt of a letter and cloth sent to her by Madhavrao.*

*No. 15*] [*21-2-1769*

पौ छ १९ सवाल
तिसा माघ मास.

श्रीकृष्णवेणीप्रसन्न

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य
राजश्री रामशास्त्रीबावा यांशि

प्रति बाजीभट्ट चाविरे माहुलीकर साष्टांग नमस्कार विनंती. उपरि, येथील वृत्त माघ वद्य प्रतिपदेपर्यंत अपले कृपेकरून समस्त सुखरूप असों. यानंतरी येथें तुमचा चिरंजिवास वधू माभळेश्वर पुर्षोत्तमभट्ट अग्नहोत्री यांची कन्या वधू अंम्ही व वेदमूर्ति गोपाळ दीक्षित मिळून त्यांशी वचन करून लग्न फाल्गुण शुध प्रतिपदा अथवा नवमी या दोंही तिथीतील येक तिथ नेमस्त करूं म्हणऊन त्यांशी करार करून त्यांजला निरोप दिल्हा. परंतु येथें खर्चवेचाचा मजकूर गोपाळ दीक्षितास विचारिला. त्यानी अपलें वृत्त सांगीतले आणि अंम्हासही विदितच आहे जे. त्यांजपाशीं द्रव्य राहतच नाही. तथापि शेंपन्नास रुपयाचा विचार करतील. त्याने हें प्रयोजन सिधीस जातें ऐसा अर्थ नाही. पांचसातशा रुपयाचें प्रयोजन आहे. अंम्हीच हाही विचार करितो, परंतु अमचेही घरीं मुलाचे व मुलीचे लग्न यांतच उद्भवले आहे. याजमुळे आमचाही विचार प्रस्तुत चालेना. यास्तव अपणाकडे सूचना लिहिली असे. तरी कांही साहित्य करून मुलास घेऊन अपणच लग्नास यावे. मणजे काही न्यून दिसणार नाही आणि तुम्ही आलियानें त्या क्षेत्रांतही श्लाघ्यता दिसेल. नाही तरी समग्र पाहुणे मात्र दिसतील. यास्तव अग्नहोत्रसमवेत अगत्य येणे. कदानचित अपणास गुंता बहुतच असला तरी मुलास साहित्य करून पाठवणे. स्थळ उत्तम आहे. अनमान न करावा. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे, हे नमस्कार. मुलीचे सूत्रही पाठविलें आहे तें मुलास लाऊन पाहणे. चारसा बोटाचे अंतर असलिया कामावर पडेल. मल्हारभट्टास पुढे पाठवणे. मावून मुल येईल. साहित्यही मल्हारभट्ट आल्यासारखे केले जाईल. +कळावे.

¶*This letter by Bajibhatt informs Ramshastri that the marriage of his son has been settled to come off shortly and earnestly requests his presence for the occasion.*

\+ संबंध पत्र बाळबोधींत आहे.

No. 16] [10-5-1769

पौा छ ३ मोहरम.

तिसा वैशाख प्रातःकाल.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी विनंती. उपरी, बृहस्पतिवारीं सायंकाळी घटिका दिवस शेष राहातां मुहूर्त तुम्हास लिहून पाठविला आहे. परंतु त्यास दोष आहे यास्तव बुधवारीं पाहाटेस सा घटका रात्रीचा उज्याडता बृहस्पतिवार तोच चांगला यास्तव तोच मुहूर्त करार जाहाला. उदईक संगमावर मुकाम होईल. परवतीस भोजनाचें सायंकाळचें साहित्य व निद्रेचेंहि तेथेंच करणें. वरकड दाणावैरणीचें साहित्य संगमावर करणें. रा छ ३ मोहरम हे विनंती.

¶*The Peshwa requests Nana Fadnis to make arrangements for his evening meal and overnight stay at the Parvati hill.*

---

No. 17] [29-12-1769

पो छ १२ रमजान

सबैन.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष. चिरंजीव राजश्री माधवराव नीलकंठ याची मुंज श्रीत्रिंबकेश्वरी करण्हार. त्यास, मुंजीकरिता श्रीत्रिंबकेश्वरी जातील.

सासवडाहू(न) ज्या मार्गें जातील, वस्तीस राहतील, तेथे चौकीपाहाऱ्याविसी दस्तक देणें १.

समागमे पंनास राऊत व पंनास माणूस हशमी त्रिंबकाहून जाऊन येत तोंपावेतों देणें १.

येक हतीण अंबारीची व दोन पालक्या बराबर देणें १.

महिपतराव त्रिंबक याजकडील ऐवज देण्याचे " देणे " यादीवर जाले आहे. त्यास, मारनिलेकडे वृतबंध आहे; सा माघ मासी देणेयाचे यादीप्रमाणें पावता करणें १.

सदरहूप्रमाणें सरंजाम करून देऊन यांची रवानगी करणें. रा छ ३० शावान सुा सबैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे, हे विनंती.

¶*The Peshwa orders that a retinue of 100 men, one female elephant and two palanquins should accompany the Purandares who were going to Trimbak to celebrate the thread-ceremony of Madhavrao Neelkanth Purandare.*

---

No. 18] [27-1-1770

पौ छ २९ जिलकाद
सबैन फाल्गुन

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बालाजी
जनार्दन स्वामी गोसावी यासी

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणें विशेष. नाटकसाळाच्या दोघा मुलांची लग्ने येंदा करणे म्हणून * * * * गंगापुराहून राजश्री हरि जिवाजी यांस लिहिले. त्याणी हुजूर लिहिले. ऐशास, गुदस्ताहि नाटकसाळाचे दोघा मुलांची लग्ने जाहाली. त्यास खर्च काये लागला तो मनास आणून त्याप्रों हाली साहित्य देऊन हरि जिवाजी याजकडून लग्नें करवणे. जाणिजे. छ २९ रमजान सुा सबैन मया व अलफ. बहुत काये लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa orders that arrangements should be made for the marriages of two illegitimate sons of the Peshwas' household.*

---

No. 19] [?

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री मोरो हरि
स्वामीचे सेवेसी

सेवक परशराम नारायेण अनगळ कृतानेक सां नमस्कार विनंती. येथील क्षेम जाणून स्वकीये कुशल लिा असावे विशेष. आपले घरी चिरंजीव कन्येचे

लग्न मार्गेश्वर वद्य ९ चे आहे. शरीरसंमंध श्रीमंत बज्याबा पुरंदरे यांसी केला आहे. तरी कृपा करून येऊन मंडप सोभिवंत केला पाहिजे. बहुत काये लिहिणे, लोभ कीजे, हे विनंती.

¶*Parsharam Narayan Angal invites Moro Hari to attend the marriage of his daughter with Bajyaba Purandare.*

---

*No. 20*] [*21-4-1774*

श्री

राजश्री हरिपंत गोसावी यांसी

विनंती. उपरी, चिठी पाठविली ते प्रविष्ट जाहली. मातुश्री गंगाबाईस पुत्र छ ६ सफर रोज गुरुवारी जाला हें संतोषाचे वर्तमान लिहिलें येणेकडून फारच समाधान होऊन आनंदावाप्ति जाहली. ईश्वरे सर्वत्रास छत्र केले. रा छ ९ माहे सफर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The writer expresses his joy on learning of the birth of Sawai Madhavrao.*

---

*No. 21*] [*5-12-1778*

श्री

वेदमूर्ति राजश्री बाळ जोसी मालगुंडकर यांसी

सेवक रघुनाथ बाजीराव प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशळ जाणोन स्वकुशळ लिहिणें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें ते पावोन नवऱ्यामुली पाहिल्याचा मजकूर लिहिला तो कळला. ऐशास, लग्न करावयाचा निश्चयच आहे येैसें नाही. समक्ष नवऱ्यामुली पाहिल्यानंतर बनल्यासारिखे मर्जीस आल्यास निश्चय होईल. सविस्तर जनार्दन मुकुंद व पांडू जेठी यांचे जबानीवरून कळेल. जाणिजे. छ १९ जिलकाद. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao, desirous of taking a new wife, writes to Bal Joshi Malgundkar about the selection of a bride.*

No. 22] [16-11-1798

पो छ १० जमादिलाखर

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री बाबा यासी प्रति जिऊबाई चापेकर अनेक आसीर्वाद येथील कुशल तागाईत कार्तिक शुध्ध ८ पावेतो मुकाम जुनर येथे वर्तमान यथास्थित असे विशेष. चिरंजीव सौ राधाबाई यास पदर घालावयाचे दिवस आहेत, येविसी राघोबास समक्ष सांगितले आहे. विनंती करील त्याप्रमाणे मुहूर्त पाहून पदर घालावयाचें करावें. दिवस राहिले नाहीत. आपण लक्ष प्रकारे यावयाचे करावे म्हणजे आम्हास भेट होईल. कलावे. येविसी अन्याबा याणीहि लिहिले आहे. बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद.

¶*Jiubai Chapekar invites Peshwa Bajirao to attend the dressing ceremony of Radhabai.*

---

No. 23] [22-2-1803 ?

श्रीराम

शेवेसी विनंती सेवक जनार्दन नारायण चरणावर मस्तक ठेऊन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा फाल्गुन शुा १ मंगळवार प्रात:कालपावेतो मुकाम माहाड येथे आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. मी अंजणवेल व सुवर्णदुर्ग तालुक्याहून माहाड तालुक्यांत येऊन येथे शोध करून आज निघोन तल्यावोसल्यावरून वसई व कल्याण प्रांतात जातो. कोा गोहागर येथे वो राजश्री विनायकभट खरे यांची कन्या वर्षे ६ सरून सात वर्षे आशाड मासीं लागेल. ती मूल चांगल्यात दृष्टीस पडली. तेव्हां वेदशास्त्रसंपन्न राजश्री नीलकंठशास्त्री थते हरणईस होतें त्यास दाखविली. त्याणी सांगितले कीं, ही मुलगी श्रीमंत माहाराजास व आपल्यास दाखवावी. त्यावरून पुण्यास रवानगी करून देत होतो तो स्वारी कोपरगावांस निघोन गेली. त्यास कोपरगावास पाठवावे तरी त्याचे म्हणणे पडले कीं, आम्ही गैरमाहीत, अनभस्त. आम्हां तुमचे बरोबर जाऊं, मधी साफ जात नाही. त्यावरून त्यास बरोबर घेतले आहेत. मुलीची मातुश्री गरोदर सात महिन्याची आहेत. त्यास मी हे तालुके पाहून त्यास घेऊन कोपरगावास यावे तरी परवानगीखेरीज येतां न ये. याजकरितां विनंती लिहिली आहे. त्यास श्रीमंत माहाराजास विनंती करून कोपरगांवास येण्याची आज्ञा घेऊन लिहून पाठवावयास आज्ञा जाली पाहिजे म्हणजे सत्वर येतो. आणखी दोन मुली यक सोमण व यक सहस्त्रबुधे

यांच्या नव वर्षाच्या मध्यम प्रतीत आहेत त्या तूर्त आणीत नाहीं. भेटीनंतर त्यांचें स्वरूप वर्णन करीन, नंतर जसी आज्ञा होईल त्याप्रो करीन. कोपरगावास येण्याची परवानगी सत्वर घेऊन आज्ञापत्र पाठविले पाहिजे. नाही तर जसी आज्ञा येईल त्याप्रमाणें करीन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Janardan Narayan, who, it appears, was touring in the Konkan on a mission of selecting a bride for the Peshwa, writes about a certain girl whom he intends to take to Kopargaon for the latter's approval.*

---

*No. 24*] [*21-8-1813*

**श्रीगजानन**

राजश्री सदासिवपंत व हरि

भगवंत गोसावी यांसी

७ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो त्रिंबकजी पाटील डेंगले रामराम विनंती उपरी. शुक्रवारचे वाड्यांतील भोजनखर्चाचे साहित्याबद्दल रा गोविंद केशव वेडेकर याचे हवाली करविले १००० रुो येकहजार चांदवड सदरहु पुणे मुा तुम्हाकडून देविले असेत. तरी सदरी लिहिल्याअन्वयें येक हजार रुो चांदवड छापी रा गोपाल बलाल आपटे यांचे हवाली करून पावती घेऊन पाठऊन देणे. रा छ २३ सावान सुा आर्बा आशर मयातैन व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती.

*Trimbakj Dengle draws upon Sadashivpant and Hari Bhagwant for the sum of Rs. 1,000 to be spent on dinner expenses at the Shukrawar Palace, Poona.*

---

*No. 25*] [*30-1-1814*

**श्रीगजागजानन**

राजश्री सदासिवपंत व हरि भगवंत

गोसावियासी

८ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रो त्रिंबकजी पा डेंगले रामराम विनंती उपरी. बुधवारचे वाड्यात छपरपलंगाचा घटाटोप मखमली केला आहे, त्यास आस्तर तापत्याचे लाविले ते काढून मखमल लाऊन स्वारी तेथे आली नाही तो तयार करून ठेवणे. सरकारचे स्वारीचा मुकाम आज दहिवडचा जाला.

---

+ 'गजागजानन' हीं अक्षरें त्रिंबकजीच्या हातचीं आहेत.

इदईक सोमवारी कूच होऊन चादसांथा अवळखाचे मुकामी जाऊ. तेथून मंगळवारी सांगुरण्याचे डोहावर मुकाम होईल. तेथून मास मुा १३ बुधवारी स्वारी पुणियास येत आहे. त्यास सरकारचे त्यारी वाड्यांत बिछाईत घालून वा चांदण्या घुवट वाल्याव्या व छतें घुवट वांधून सरकारमर्जीजोगी तयार करावी व गणेशपंठनील वाड्याची बिछाईत घालून चांदण्या घालाव्या. कोणताही गोष्ट म पडे ऐसा बंदोबस्त ठेवावा. पदारियांची बातमी काय आहे असेल ती लिहून पाठवावी. रा छ ७ सफर साइंकाल मुा दहिवड. बहुत काय लिहिणे हे विनंती.

*[Trimbakji Dengle from Dahiwad instructs Sadashivpant and Hari Bhagwant to decorate Peshwa's palaces in Poona tastefully.*

---

## 2. The Ganapati Festival.

*No. 26]* *[9-8 1768*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक सुबाजी सेशाद्रि साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २३ रबिलोवलपर्यंत सेवकाचे व किले कोरीगडचे येथास्थित असे विशेष. स्वामींचे आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा जे. गणेशचतुर्थीच्या मोरपिसाचे सरकारात प्रयोजन आहे. आमचा.... त्यास .... पावे ते करणे म्हणोन आज्ञा. आज्ञेप्रमाणे प्रयत्न करून सेवेसी .... जाले पाहिजे हे विज्ञापना.

*Subaji Seshadri, from Korigad, writes to the Peshwa that, as desired by him, he will arrange to send the peacock-feathers required for decoration on the occasion of the Ganpati festival.*

*No. 27]* [illegible]

श्री

No. 28] [12-9-1774

पौ छ ६ रजब सुा
खमस भाद्रपद मास वा
रामजी गंगाजी जथे वजाजी ना

श्री

राजश्री नारो आपाजी स्वामी गो यांसी

विनंती. उपरी, श्रीगणपतीचा उत्साहा होत आहे त्यास ललिताचे दिवसी समारंभ बहुत होत असे तो तसा करावयाचा नाहीं. नित्य हरिकीर्तन होत असते त्याप्रमाणेंच ललिताचे रोजी करून ललिताच्या चार ओव्या म्हणून आर्ती करवावी. खिरापत वाटल्यानंतर स्वस्तपणें बसोन प्रसाद श्रीमंतास वगैरे वेणे ते घ्यावे. बंदोवस्त चांगला राखावा. गणपति पोहोचवाल त्या दिवशी पालखींत गणपति घालून समागमे वाजंत्री यांचा एक ताफा देऊन पोहोंचवावा. आणखी कांहीं समागमे न देणे. थोडक्यात लिहिल्याप्रमाणें करावे. जाणीजे छ ९ रजबु सुा खमस सबैन मया व अलफ. हे विनंती.

¶*Instructions from Sakharam Bapu to Naro Appaji regarding the celebration of the Ganpati festival.*

---

No. 29] [29-8-1778

पौ छ ७ साबान भाद्रपद
तिसा सबैन.

श्री

सेवेसीं मल्हार बलाल साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ६ साबानपर्यंत स्वामीचे कृपेंकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. पुरंदरी श्रीगणपतीचा उत्साह चतुर्थीपासून काल शुक्रवारपर्यंत यथास्थित जाहला. रात्रौ नित्य श्रीमंत कथेस बसत होते. दीड पावणेदोन प्रहरपर्यंत रात्र कथेस होत असे. काल सा घटिका दिवस शेष राहिला होता, तेव्हां श्रीगणपतीचें प्रस्थान जाहलें. स्वारीसमागमें श्रीमंत गेले होते. पर्जन्याची झड बसली होती, परंतु स्वारी जातेसमई चांगला पर्जन्य उघडला होता. स्वारीस शोभा फारच चांगली आली होती. राजहंस वच्या हती याजवर जरीपटका दिल्हा होता व तेजरावा हतीण सिवापुराहून आणिली होती तिजवर नौबत ठेविली होती. श्रीमंताची मर्जी बहुतच प्रसन्न होती. आज तेजरावा हतीण मागती सिवापुरास रवाना केली. स्वारीचा बंदोबस्त राजश्री बलवंतराव पटवर्धन याणी चांगला केला

होता. आपण श्रीमंताचे पालखी जवळ होते. स्वामीच्या वाड्यापुढील रस्त्याने थोरल्या तल्याकडे स्वारी गेली होती. रजब महिन्याच्या कीर्दी जिनसखाना, जामदारखाना व रत्नशाला ऐशा झा छ १६ रजब ता। छ २९ मि।पर्यंत व वाकेनिसाकडील खर्चाच्या यादी सदरहू तेरखांच्या व येक खिजमतगारांच्या गुजारतीच्या खर्चाची ऐशा यादी व कीर्दी पाठविल्या आहेत. सेवेसीं प्रविष्ट जालियाचें उत्तर आलें पाहिजे. यादी व कीर्दीचे बंद दफ्तरांत स्वारीकडे द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे. राजश्री बाळाजी गोविंद. प्रां बुंधेलखंड यांजकडून श्रीमंतास आवघी रंगीन पाच पोशाख येथें राजश्री आपाजी जनार्दन घेऊन आले त्याची किमंत रुो

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १५० | तिवटें | ५ | दर | ३० |
| १२५ | दुपटे | ५ | दर | २५ |
| १२५ | शेले | ५ | दर | २५ |
| ४०० | | १५ | | |

येणे प्रो च्यारशें रुपये किमतीची पंधरा सनगें आलीं त्याजवर तिवटा आख घालून त्याची याद आलाहिदा पाठविली आहे. तीं सनगें ३ सावानी कीर्दीस जमा धरावयाची आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Malhar Ballal gives an account of the celebration of the Ganpati festival at Purandar.*

---

*No. 30]* *[23-8-1815*

**श्री**

शेवेसी चिंतो वामन देशमुख कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना विशेष. श्रीगणपतीचे उछाहाबद्दल सालमजकूर सन सीत आशर मयातैनचे खर्चाबद्दल ऐवज सरकारांतून पोतापैकीं राजश्री जनार्दन कोंडदेव गाडगील पोतनीस याजकडून देविला ते : रुो रुो

२५०० खुद आमचे विद्यमाने खर्च व्हावयाचा ते

१५०० श्रीगणपति व ऋधीसिधीच्या वगैरे मूर्ति मृन्मयकरावयाबद्दल

१००० रोशनाईकडे मेणबत्या खरेदी बा

२५००

5060

१२००० आपाजी रामचंद्र आगाशे कारकून दि॥ जवाहिरखाना याचे व आमचे विद्यमाने खर्च हरिदास व गुणिजन यांस विदागीस नक्त व सिध्याचे जिनसाचे व कापडाचे खरेदी बा॥

७५०० विदागीबद्दल नख्त व कापड मिळोन

४५०० सिध्याचे जिनसाबद्दल

---

१२०००

---

१४५००

येकूण चवदा हजार पांचसे रुपये चांदवड छापी सदरहूप्रमाणे देविले ते आमचे हवाली जाहाले. छ १७ रमजान श्रावण मास सु॥ सीत आशर मयातैन व अलफ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Chinto Waman acknowledges the receipt of a sum of Rs. 14,500, sanctioned for the expenses of the annual Ganpati festival.*

---

**3. Education, sport, travel.**

*No. 31*]

**श्री**

विज्ञापना. श्रीमंत राजश्री नारायेणरावसाहेबाचे अक्षर पाहावयास पाठविले आहे. पाहावे. हे विज्ञापना.

¶*Young Narayanrao's handwriting is submitted for the Peshwa's inspection.*

---

*No. 32*] [*29-12-1761*

**श्री**

राजश्री मोकदम मौजे पानवडी गोसावी यांसी

श्रो॥ नीलकंठ माहादेव पुरंधरे आसीर्वाद. सु॥ इसने सितैन मया व आलफ. राजश्री रामशास्त्री यांची वस्तभाव व कुटुंब यैसे मौजे मजकुरी आले आहेत. तरी मौजे मजकूरचा बेरडास ताकीद करून चौकीपाहारा चांगला करीत जाणे. जाणिजे. छ २ माहे जाखर.

¶*Neelkanth Mahadev Purandare orders the Mukadam of Panavdi to look to the safety of Ramshastri's family who had gone to that village with their belongings.*

No. 33] [19-10-1764

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पो॥ रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. पुस्तकाकडील लेखक आ॥ ३ तीन व सदासिव कृष्ण कारकून येकून च्यार आसामी यास पुणेयास येतील त्यास वाडेयात भोजनास घालून कागद व शाई वगैरे सामान लागेल ते देत जाणे. रा॥ छ २३ रविलाखर सु॥ खमस सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao requests Nana Fadnis that the three scribes who are employed should be provided with writing materials and other necessaries at Poona.*

---

No. 34] [4-1-1765

पौ॥ छ १८ रजब पौष मास

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसांवी यांसी

पो॥ नारायणराव बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करीत जावे विशेष. तीर पाठवावयासी पूर्वी तुम्हास तपसीलवार याद पाठविली. परंतु अद्याप तीर पाठविले नाहीं. याजकरितां हाली तीर आणावयाकरिता फिरंगोजी नवल्या खिजमतगार पाठविला असे. तरी पत्र पावतांच तीर सत्वर पाठवणे व लिखिते वाचावयाकारितां थोर थोर सेपन्नास पावेतो जरूर पाठवणे. आजपर्यंत तीर येतात म्हणून मार्ग पाहिला. परंतु यावयाची अवध चुकली. पत्र गेल्यास बहुत दिवस जाहाले, तेंव्हा तुम्हांस कारभारामुळे विसमृत जाली हा निश्चयहि दिसोन आला. यास्तव खिजमतगार या कामगारीस मुजरद पाठविला आहे. तर कारभारामध्ये दोन घटका अवकाश करून पूर्वी लिहिल्याप्रमाणे तीर सत्वर पाठवणे, व लिखितेहि सत्वर पाठवणे. रवाना छ ११ रजब. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Narayanrao Ballal requests Nana Fadnis to send the arrows, which he had asked for long ago, and some Modi handwritings for practising reading.*

No. 35] [19-11-1766 ?

श्री

वडिलाचे सेवेसी अपत्ये आलीबहादर विज्ञापना. येथील क्षेम ता छ ११ माहे सफर मुक्काम पुणे आसीरवादेकरून सुखरूप असो विशेष. बहुत दिवस जाले, वडिलाकडून आसीरवादपत्र आले नाही. सदैव पत्रे पाठऊन लेकरांचा सांभाल करीत असिले पाहिजे. वडिलासिवाई कोण करणार आहे? लिहिणे सिकवावयासी पंतोजी पाहिजे; त्यास, वडिलाचे वेलेचा येमाजीपंत आहे त्यास तैनात सालिना होती नख्त रुा ५०० व कापड आख १०० येणेप्रमाणे आहे. वडिलानी करार करून देविला पाहिजे. खासी घोडी बसावयाची होती ती मेली. दुसरी खासी घोडी नाही. त्यास वडिलानी खासी घोडी चांगली गरीब देविली पाहिजे. सेवेसी रंगोपंत कारकून पाठविले आहेत, हे सर्व कामकाजाविसी विनंती करितील त्याजवरून विदित होईल. चालविणार वडील आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Ali Bahadar requests the Peshwa to sanction the remuneration for his teacher Yamajipant and to supply him, for riding, a new mare as the old one has died.*

---

No. 36] [12-12-1766

पौ छ १६ रजब्
सबा मार्गसीर्ष

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी

विनंती. उपरी, अलीबाहादर यांजकडील गाडीचा बैल येक मेला. त्यास मुबादला बैल येक तोफखानापैकी पाहून देणें. पांच उंटे त्यांची लस्करांत आली होती तीं माघारी पा असेत. वाटेची बेगमी येथून केली असे. वरकड त्यांजकडील किरकोल कामकाज असेल तें तुम्ही मनास आणून करून देत जाणें. रा छ ९ रजब सुा सबा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis, asking him to pay attention to all the requirements of Ali Bahadar.*

5063

No 37] [23-2-1767

पो छ सवाल सन
सबा सितैन.

श्री

पुा राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी,

वो राजश्री मोर जोसी यांस पद्म-पुराणाचे गणपतिसहस्रनाम ल्याहावयाची आज्ञा जाली होती, ते त्याणी लेहून दिल्हे ते पाठविले आहे म्हणौन लिहिले ते कळलें. गणपतिसहस्रनाम येऊन पावलें.

सिव्हाच्या तोंडाचा तोडा करावयाची आज्ञा जाहाली व कडी निमोनियाची पाठविली ते पावली. त्याप्रो, तोडा अंतू सोनार सातारकर याचे हातचा वाटला, त्यासच बोलाविला आहे. त्याजकडून करवितो म्हणौन लिहिले ते कळले. उत्तम आहे.

रा छ २२ रमजान. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa acknowledges the receipt of a certain manuscript sent by Nana Fadnis.*

---

No. 38] [29-10-1769

पौ छ ४ रजब.

श्री

राजश्री मोत्याजीराव विचारे गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री विसाजी केशव आसीर्वाद विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावें विशेष. श्रीमंत सौभाग्यादिसंपन्न मातुश्री पार्वतीबाई व रमाबाई श्रीगणपति पुळे येथे येणार तेव्हां रत्नागिरीसहि येतील. तरी महादेव पाल व दत पाल आणखी दोनच्यार गलबते सदरहू पाल गोदीतून बाहीर काढून कार्याकारण चालतें सामानाची तरतूद करून रत्नागिरीस आणून बाईसाहेबांस दाखवणे. हकारणी करून तोफांची सरबती करून दाखवणे. दोन वेळा सरबती करणे. रा छ २८ जाखर सुा सबैन मयां व अलफ. बहुत काये लिहिणे, लोभ करावा, हे विनंती.

¶*Visaji Keshav writes to Motyajirao Vichare that he should arrange to show, at Ratnagiri, four or five ships and fighting vessels to Ramabai and Parvatibai when they visit that place during their trip to Pule. He further asks that two rounds should be fired from the ships in their presence.*

5064

No. 39] [17-9-1763

श्री

राजश्री नारो आपाजी गोसावी यासी

सुा आर्बा सितैन मया व अल्फ. सरकारची पुस्तके आहेत, त्याची कारकुनी सदासिव कृष्ण आंबेकर यास आहे. त्यास, त्याजला बोलाऊन आणून, पुस्तके होती किती, त्यापैकी गेली काये, बाकी राहिली किती, हा झाडा पुस्तकांचा काढून लिहून पाठवणे. पिवले पत्राचे भारथ होते ते गेले किंवा राहिले त्याचा शोध काढून लिहून पाठवणें. जाणिजे.

छ ८ रौवल. बहुत काये लिहिणे

*¶[Naro Appaji is asked to take stock of the books belonging to the Peshwa's library and to make a detailed report, mentioning therein the number of missing ones.*

---

No. 40]

श्री

राजश्री बालाजीपंत नाना
गोसावी यांसी

ॐ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री माहादजी सिंदे दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल जाणौन स्वकीये कुशललेखन करीत असिले पाहिजे विशेष. श्रीमंतास येथे पुस्तकाचे अगत्य आहे. त्यास या कामाकरितां खंडो व्यंकटेश व सदासिव राम शागीर्द पाठविले आहेत. तरी अलाहिदा यादी पाठविली आहे त्याप्रमाणे पुस्तके व दयाराम भट वैद्य याजकरवीं औषधें केली आहेत तीं व हरणें पुण्यातील व टोक्याहून नेली ती उभयताबाार सत्वर पाठऊन द्यावी. अगत्य जरूर जाणौन श्रीमंतानी शागीर्द पाठविले आहेत. रा छ २० जावल. बहुत काये लिहिणे, लोभ कीजे, हे विनंती.

*¶[Mahadaji Sindia asks Nana Fadnis to send, among other things, certain books which were badly needed by Raghunathrao.*

---

No. 41] [2-1-1776

पो छ १० जिलकाद
सीत सबैन

श्री

विनंती. इंग्रजाकडील वकील आला आहे तो श्रीमंताचे भेटीस येईल. त्याच्या टोप्या व आंगरखे पाहून श्रीमंत भयाभीत होतील, यास्तव आगोधर धीट करावे

5065

लागते. ऐशास जामदारखान्यांत व जिनसखान्यांत वगैरे कारखान्यांत टोप्या व आंगरखे इंग्रजाचे साजाचे व सोंगाचे पाठऊन द्यावे म्हणौन पत्रीं लिहिले. त्याजवरून टोप्या व कुडत्या पिलोन साडे(स)हा सनगे पाठविली. त्याची याद आलाहिदा पाठविली आहे. सदरहू सनगे महमद रफी सांडणीस्वार दिा पागा हुजूर निा गोविंदराव सदाशिव याजवरावर रवानगीस लिहून पाठविली आहेत. सरकारांत प्रविष्ट जाहालियाचे उतर पाठविले पाहिजे. रवाना छ ९ जिलकाद सोमवार हे विज्ञाति.

¶*Some English bonnets and coats were supplied for the wardrobe of the young Peshwa in order to make him accustomed to the English dress so that he might not get frightened at the strange costume of the British envoy when he presents himself before the young Peshwa at Purandar.*

---

*No. 42*] [*11-1-1784*

श्री

यादी पुस्तके मातुश्री सगुणाबाई यांजकडील पुस्तकशालेकडे जमा. सुा आर्बा समानीन मया व अलफ छ १७ सफर.

किता

१ अध्यात्म रामायण

| | पत्रे |
|---|---|
| १ बालकांड | ७१ |
| १ अयोध्याकांड | ६९ |
| १ अरण्यकांड | ९१ |
| १ किस्किंदाकांड | ५७ |
| १ सुंदरकांड | २९ |
| १ युध्यकांड | ९७ |
| १ उतरकांड | ७२ |
| ७ | ४४२ |

किता

१ प्राा पोथी

१ योग वासिष्ट पत्रे ७२

१ हरितत्व मुक्तावली ८९

२

---

१ कर्णामृत

१ प्राा शतकमूल

दर शतकाची पत्रे ९ प्रो २७

१ प्राा टीकाकर्षणामृत

| | |
|---|---|
| १ प्रथम पत्रे | ५० |
| १ द्वितीय | ६४ |
| १ त्रितीय | ६३ |
| ३ | १७७ |

१ पंचदसी
- १ द्वैत विवेक १०
- १ वाक्य विवेक ३
- १ भूत विवेक १४
- १ तत्व विवेक १६
- १ पंचकोश विवेक १०

५३

- १ चित्र दीप ३५
- १ नाटक दीप ६
- १ ध्यान दीप २२
- १ तृप्ति दीप ४४
- १ कूटस्त दीप १२

११९

- १ ब्रम्हनंदापासून विशयानंदपर्यंत पत्र ६७

११ २३९

१ भागवत स्कंद २
- १ द्वितीयाध्याय ३१
- १ येकादश ११९

२ १५०

१ भागवत स्कंद पत्र
- १ प्रथम ८७
- १ द्वितीय ४८
- १ चतुर्थ स्कंद ११७

३ २५२

१ प्रा पोथी लहान
- १ सूर्य नामावली तृटित पत्रे ४
- १ कृष्ण अष्टशत नामस्तोत्र पत्रे ८
- १ देवी अष्टशत नामावली पत्रे ४
- १ सिवाष्टक स्तोत्र पत्रे २
- १ सप्तशतीतील देवीकवच १८
- १ गौरीदशक पत्रे ३
- १ द्रोपदीक्रांतस्तव पत्रे १
- १ भागवतातील दशम स्कंदातील अध्याय पत्रे १२
- १ गजेंद्रमोक्ष भागवतातील पत्रे १६
- १ भागवतातील अध्याय येक ३
- १ भागवतातील प्रथम स्कंदातील अध्याय तिसरा पत्रे ८
- १ गीतेंतील अठरावा अध्याय पत्रें ८
- १ सिव सहश्रनामावली पत्रे १८
- १ भागवतातील दशम स्कंद पैकी अध्याय येक पत्रे १६
- १ रामस्तोत्र अध्यात्मरामायणातील पत्रे ३
- १ विष्णुस्तुति ब्रह्मनारदीतील पत्रे १५
- १ आदित्यरुप्य (?) स्तोत्र बंद ३
- १ रामस्तोत्र बंद २

१८

३

१०

5067

१ वही किनखापी
- १ गणेश सहस्रनाम
- १ विष्णु सहस्रनाम
- १ वासुदेव स्तोत्र
- १ जन्म रहस्य
- १ यम गीता
- १ द्वादशअध्याई भागवतातील
- १ गीतगोविंद

—

७

१ प्रा जडगिरी बंद बारिका अक्षराचे ताईतातील
- १ भागवत
- १ गीता

—

२

१ गीता चित्रासहित पत्रे १२० लों

—

७

सामान — सुमार

९ वष्टणे
- ४ खारवी
- ३ तास्याची
- २ गजनीची
  - १ प्रा अस्तर किनखापी
  - १ किता

  —

  २

—

९

७॥ फल्या जोड
- ७ प्रा जोड
- १ फली येक

—

८

—

१६॥ फल्या १५

येकूण पुस्तके दाहा व वेष्टणे नऊ व फल्या लाकडी सुमार १५ पंधरा सदरहूप्रो पुस्तकशालेकडे जमा असेत.

*¶This is a list of books which were in the possession of Sagunabai, wife of Janardan Bajirao. Many similar lists of books have been discovered: this one is fuller than the others, which are therefore not printed here.*

+ सगुणाबाई जनार्दन बाजीरावाची बायको, रामजी अनंत शिंदे यांची कन्या, लग्न २०-५-१७४५. जनार्दनपंत २१-९-१७४९ रोजीं वारला. त्याचे पश्चात ही बाई पुष्कळ वर्षे जिवंत असून ती १३-११-१७८३ रोजीं वारली. तेव्हां तिच्या जिनगीची नोंदवह झाल्यापैकीं ही पुस्तकांची यादी ता. ११-१-१७८४ ची आहे. या यादीवरून त्यावेळीं सरदार स्त्रियांचें वाचन व ज्ञान कशा प्रकारचें असावें याचा अंदाज होऊं शकेल. पेशव्यांच्या घरचे पुस्तकांचें भांडार मोठें होतें. तेंच हल्लीं भांडारकर इन्स्टिट्यूटमध्यें असावें.

No. 43] [26-3-1767 ?

पौ छ २९ सवाल

फाल्गुन

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी
जनार्दन स्वामी गोसावी यासी

पोष्य नारायणराव बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहिणे विशेष. दाहा बोथाट्या उतम वेंडाच्या बुढ्यासमेत, त्यात दोन आम्हाजोग्या बारा हात लांब आखूड पेराच्या, व दाहा भाले फली बुढ्यासमेत तयार करून पाठवणे. दोहोंचहू दिवसी घोडी फेरावयास जाण्यामुळे बोथाट्या फार मोडतात. बोथाट्या व भाले सत्वर पाठवणे. रवाना छ २१ सवाल. बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶Narayanrao asks for some bamboo-sticks from Balaji Janardan, as they get frequently broken in the lance exercises. The whole letter is in his own hand.*

---

No. 44]

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पोष्य नारायणराऊ बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. नंदराम बिन भवानी पहिलवान याचे घरीं लग्न आहे याकरितां पुण्यास आला आहे. यास इा छ १ सवाल ताा छ १९ मिनहू पावेतो पंधरवडा सिधा सिरस्तेप्रमाणें रुजू पाहून देणें. पुढें सिधा न देणें. गंगापुरास रवाना करणें. रा छ २० माहे रमजान. बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶Narayanrao Ballal writes to Nana Fadnis about allowance to be given to a certain wrestler who, presumably, was under state patronage.*

No. 47] [25-4-1769

पौ छ २० जिल्हेज

तिसा सितैन.

श्री

सेवेसी सदासिव अनंत कृतानेक सा नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १७ जिल्हेज येथास्थित असे विशेष. आवल्याचा मुरांबा वजन पक्के ८। दाहा सेर येकून येक घागर व पंखे दांडीचे दोन, पैकी येकास चांदवा वाल्याचा व येकास किनखापी, झालर ताम्त्याची पिवळी तांबडी दोन प्रकारची, येकून पंखे दोन सेवेसी पाठविले आहेत. पावल्याचे उतर पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे. स्वामीचे चितात काही दिकत येईल, तरी सरकारचे लांझ्याचे नाही. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Sadashiv Anant requests the Peshwa to accept two fans and one potful of jam made of certain medicinal fruits.*

---

No. 48] [18-11-1765

पौ छ ११ जाखर

मार्गसीर्ष मास

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. माणकोजी चितारी यास त्रिंबकी चित्रे काढावयास नेहमी आज्ञा केली आहे. त्यास, याचे सामान पुणियात घडोची व रंगाचे खल वगैरे जे. असेल त्यास दोन कामाठी वोझियास देऊन त्रिंबकास पोहचाऊन देणे. जाणिजे. छ ४ जााखर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao asks Nana Fadnis to make arrangements to send Mankoji, a painter, to Trimbak where he had been ordered to execute some work.*

---

No. 49] [13-1-1766

श्री

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे शेवेसी विनंती. सेवक जिवाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १ साबानपर्यंत स्वामींचे कृपेकरून वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनी कृपा करून आज्ञापत्र सादर केले ते प्रविष्ट होऊन

5071

लेखनार्थश्रवणे संतोष जाहाला. संक्रमणप्रयुक्त तिळशर्करा पाठविली ते पावली. हिराबाग वडगाव येथील समाचार घेत जाणे, बेलाची झाडे यांची निगा करणे, म्हणून आज्ञा. आज्ञेप्रो बागेचा समाचार घेऊन झाडाची निगा करवितों. सदैव पत्रीं कुशलार्थ लेहून आज्ञापत्र सादर करणार स्वामी समर्थ आहेत. त्या प्रांती काही अपूर्व जिनस आसले तरी त्याचे बीज बागेत पेरावयासी पाठवावयाची आज्ञा करावी. आम्हाकडून विनंतीपत्र येत नाही म्हणून स्वामींनी पत्री आज्ञा केली. त्यास, आम्ही विनंतीपत्र लेहून सेवेसी मुजरत पाठवावे तरी दूर देश. स्वामीकडून पत्रें श्रीमंताकडे येतात तीं लस्करातून परस्परें उतरें जातात. येथे कोण्ही येत नाही. त्यास, वर्तमान मुजरद येथे लेहून पाठवावयासी आज्ञा केली पाहिजे म्हणजे सेवेसी विनंतीपत्र पाठवीत जाऊ. विदित जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Jiwaji Ganesh assures Raghunathrao, who, at this time, was in Northern India, that, as desired by him, his garden at Vadgaon would be properly attended to.*

---

*No. 50*] [*5-12-1765*

पैवस्ती छ २२ जावल.

**श्री**

आज्ञापत्र राजश्री रघुनाथ बाजीराव ता। गुलाबराव खोज्या. सु॥ सीत सितैन मया व अलफ. नारायेणदास वगैरे नटवे असामी साहा आनंदवलीस आहेत त्यांचे प्रयोजन हुजूर असे; तरी नटव्यास हुजूर पाठऊन देणे. जाणिजे. छ २० जावल. आज्ञा प्रमाण.

¶*Raghunathrao orders that the six dancers, who were at Anandvalli, should be sent to him.*

---

*No. 51*] [*8-3-1766*

**श्री**

आज्ञापत्र राजश्री रघुनाथ बाजीराव ता। गुलाबराव खोज्या. सु॥ सीत सितैन मयां व अलफ. तू आज्ञापत्राचे उतराची अर्जी पाठविली ते पावली. कुवरेंचा मार लिहिला तो कलला. त्यास तिजला ठेऊन घेणे. खासा स्वारी आनंदवली दुसरे जेष्ठ आषाढ मासी येईल. चौदा पंधरा महिन्यांच्या अवकाश आहे, तोपर्यंत तिणे गावयास व नाचावयास शिकोन चांगले तरबेज व्हावें कीं

खासा स्वारी आलियावर गाणं नाचणं पाहून मर्जी खुप होय ऐसे करावे. ती संतोषाने जाईल तरच निरोप द्यावा म्हणोन लिा होते. याउपरी बहुत तिचे समाधान करून ठेऊन घेणं. वरकड नाटकशाळासहि हुजूर आणावयाचे नाही. त्यांस गायननृत्याचा अभ्यास दिवसेदिवस अधिकोतर करऊन स्वारी येई तोपर्यंत तरवेत व्हावे कीं मर्जी खुप होय ऐसे कसब करवणें. सोमवारी श्रीजवळ गायन नृत्य पहिले आज्ञेप्रो करवीत जाणें. जाणिजे छ २६ रमजान.

¶*Instructions are sent to Gulabrao Khoja to train properly the dancing girls who were enjoying the patronage of Raghunathrao.*

---

*No. 52]* *[1816*

श्री

विशेष. श्रीमंताची स्वारी दर्शाकरितां फुलगावांस भिमातिरास गेले. जातांना मार्गात रथ उलथून पडल्यामुळे हातास जखम लागली आहे. झाडून मंडळी अज तेथें गेली आहे त्याजमुळ च्यारआठ दिवस तेथे स्वारी राहील की काय? स्वारी आल्यावर मर्जी संतोषाची पाहून विनंती करण्यांत येईल. राजश्री आबास पत्र लिा ते प्रविष्ट केले. आपणास कळावें. लोभ करावा हे विज्ञापना.

¶*The carriage in which the Peshwa was travelling to Phulgaum having turned turtle, the occupant suffered a severe injury to his hand.*

---

*No. 53]* *[7-6-1810*

श्री

चिरंजीव राजश्री चिमण्या यासी बाजीराव रघुनाथ प्रधान आसीर्वाद उपरी. तुमचे कुलबाब खर्चाची नेमणूक सालीना दोन लक्ष रुपये कुंपिणी इंग्रजबहादूर यांचे विद्यमाने मार्गसीर्ष शुध्ध प्रतिपदा सन सबा मयातैनापासोन ठरली आहे. त्यास इा मार्गसीर्ष शुध्ध प्रतिपदा सन सबा मयातैनापासोन कार्तिकअखेर साल मार सन इहिदे आशर मयातैनपावेतो दरसाल दोन लक्ष रुपये पो च्यार साला आठ लक्ष रुपये नेमणूक प्रमाणे तुम्हास पावले. हाली इा मार्गसीर्ष शुा प्रतिपदा साल मजकूर सन इहिदे आशेर मयातैन ताा कार्तिक अखेर पेस्तर साल सन इसने आशर मयातैनपावेतो सालसंमधी खर्चाचे नेमणुकेचे दोन लक्ष रुपये द्यावयाचे. त्यापैकी मार्गसीर्ष व फाल्गुनमासचे हापत्याचे येक लक्ष रुपये तुम्हास पावले. बाकी येक लक्ष रुपयापैकीं ज्येष्ठ मासचे हापत्याचे रुपये पंनास हजार

५०००० चांदवड पाठविले असत. येऊन पावलियाचे उत्तर पाठवावे. रा छ ४ जमादिलोवल सुा इहिदे आशेर मयातैन व आलफ. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

*¶The Peshwa's brother Chimnaji had an annual allowance of two lacs assigned to him for his personal expenditure. The amount of fifty thousand Rupees, being the third instalment for the year, has been sent herewith.*

---

*No. 54]* *[1-5-1815*

पौा छ २१ जोवल

सन खमस आशर मया तैन

**श्री**

सेवेसी कासी विश्वनाथ वैशपायन मुा सिंहीगड सिर सा नमस्कार विज्ञापना. ताा छ २० जोवलपावेतो किले मजकूरचे व शेवकाचे वर्तमान यथास्थित असे. श्रीमंत राजश्री माहाराजाची स्वारी सोमवारी सायंकाली सिवापुरास येणार, यास्तव किल्यापौ तोफा मारावयाची परवानगी जाहल्यास सिवापूरपर्यंत डाक ठेवावी म्हणोन आज्ञापत्र आज सोमवारी सायकाली च्यार घटका दिवसास आले. आज्ञे-प्रमाणे किल्यापैकी दाहा आसामी रा सखोपंत वर्वे व चिमाजी पाटील सरदार याजबराबर देऊन रवाना केले आहेत. जागा जागा डाकेस आसाम्या ठेऊन दोन तीन आसामीनिसी सिवापुरास दाखल होतील. तोफाची आज्ञा होईल त्या-प्रमाणे आवाज काढऊं. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Kasi Vishwanath Vaishampayan from Sinhagad writes about the arrangements he was asked to make in connection with the visit of Shrimant Maharaj to Sivapur.*

---

*No. 55]* *[June-July 1817*

**श्री**

यादी स्वारीबराबर पंढरपुरास सरंजाम
वगैरे न्यावयाचा ते सुा समान आशर
मयातैन व अलफ. शके १७३९.

माहे आषाढ मास.

कित.

१ गेला तुपाचा.

२ समया पितली.

कित.

१ राहुटी कनाथा खांब वदरखासुधा.

१ चंबू पितळी शाईचा.
१ तपेल कल्हाच वजन ८८४॥९
१ तपेल पितळी कल्याच शेरचा.
१ पातेल ता। थोर वजन ८८५॥३.
१ तपेल काले ता। थोर.
१ घंगाल.
१ पातेल ता। का। उभट.
२ घागरी.
२ खोरे कुदळी दांडेसुधां.
१ तपेली पितळी वजन ८८१८१३.
१ तवा लोखंडी.
२ कढई झारा लोखंडी सौ रखमाबाई पो.
१ पळ्या पितळी १ लोखंडी ०
१ वेळणी.
१ कथली सौ योगाबाई पैकी.
१ विळी.
१ किता.
  १ दुरडी व रवळी चवरंग.
  १ कावड व पोलपाट लाटणे.
  १ काठ्या व पाट व रवी.

---

१ तपेल थोर पाण्यास.
० वेलणी.
२ पातेली पितळी लहान २.
१ परात.

१ पालबुर्जी खांत्रसुधा.
१ कनाथ शेतखान्याची.
१ कटाला ४.

किता जिनस.
  १ तां। बारीक व मोठे.
  १ दाळ तुरीची.
  १ कणीक.
  १ हिंग, हळद, जिरे, मिरे, धने.
  १ मीठ.
  १ गूळ व साखर.
  १ आंबसोल.
  १ भाजी मालवे वगैर पानेसुधां
  १ पीठ हरभरे व जोरीचे.
  १ सुपारी सुंठ खडीसाखर.

---

भांडी रुप्याची ता। रावोबा जोसी.
८३। लोटीभार साधी १.

भार
ताट.
वाट्या.

¶*Here is a list of provisions, utensils and other articles intended to be taken with the Peshwa to Pandharpur.*

## 4. Domestic Animals.

No. 56] [2-4-1793

पौ॰ छ २ रमजान

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक नारो बाबाजी सा। नमस्कार विज्ञापना. ता। छ २० माहे शाबान पावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानंतर छ १० माहे मजकुरचे आज्ञापत्र सादर जाले ते छ १९ रोज माहे मजकुरी पावले. तेथे आज्ञा कीं चैत्र शुध अष्टमी बुधवारी आवसी च्यार घटका रात्रीस इकडे तारा पडला. गडगडलें. याप्रो तिकडें जालें न जाले ते लेहून पाठवणे म्हणौन आज्ञा. त्यास वे॥ राजश्री विनायेक जोसी याणी पारनेरीहून लिहिले कीं बुधवारी संध्याकाली दोन घटिका रात्रीसमई मोठा तारा तुटोन अग्नीदिशेकडून आला, परंतु भास मात्र अग्नीदिशेचा. केवल मध्यभागी अदो देखिला, तेथून नैरूत्यस सनिध उतरला येसें देखिले. नेत्रास झांपड पडली. दुर्धर तेजोमये देखिला. त्याचे टुकडे दोन जाले. येक टुकडा वर्तुलगोल, दुसरा टुकडा त्यास पिसारा आकाशापासून भूमिपरियेत, सहस्रावधी मणुष्यानी पाहिला. आपणहि पाहिला. तदनंतर तोफेच्या आवाजासमान तीन शब्द मोठे जाले. त्यावर मेघगर्जनेसमान गंभीर गर्जन जालें. येसा निर्वात उल्कापातसहित जाला म्हणौन विनायेक जोसी याणी लिहिले होते; व गंगातीरप्रांतीहि तारा दोन घटका रात्रीसमई पडला हे सर्वत्रानी पाहिला, परंतु शब्द जाला हे कोण्ही येकिले न येकिले. येविसीचे वर्तमान व पर्जन्य गाराचे वर्तमान यापूर्वी हुजूर सेवेसी विनतीपत्र लिहून पाठविलेंच आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Naro Babaji writes to the Peshwa, describing the phenomenon of the fall of a meteor at Parner.*

---

No. 57] [1798?

श्री ४

साष्टांग नमस्कार विनंती. अलीकडे आपणास पत्र पाठवावे त्यास सातारा शहरात देवी बहुत आल्या आहेत आणि देवी आणावयाचा वैद्य सातारा आला होता. आमचे घरी मुलास व चिरंजीव सौ॥ यमुनेस देवी आल्या नवत्या, याजकरितां वैद्यास आणून तोटका केला. मूल दोन व चरंजीव सौ॥ यमुना व आपाजीपंताचा मूल व पुत्र व बाळाजी हरि याचा पुत्र इतक्यास वैद्याने देवी

आणविल्या त्यामुळें पंधरावीस रोज बहुत घाबरे जाहलों. काही सुचेनासे जाहले होते. परंतु आपले अशीर्वादेकरून आरोग्य जाहली. आपणास कळावें म्हणून लिहिलें आहे. फाजलाचा पैका कांही पाा देतो. रागास न यावें. चिरंजीव रामचंद्र सुखरूप आहे. दस्तूर बजिनस पाा आहे कळो येईल. आपणाकडील साध्यांत (साद्यंत) लेहून पाठवावें. बाळाजी धोंडदेव याविसी पेशजी आपण लिहिले. त्यास येथें त्याचा आमचा कजिया जाहला. घोडी, माणसें व कटाळ बाहेर टाकून दिल्ही. सर्व होणे ते जाहले. उपरात तो काही सौरसाचे बोलत होता की लस्करांत कांही आपणापासून दस्ताऐवजी गुतले नाही. आतां मोरोपंताचे माझे समाधान करून द्यावे आणि दुसरा रोजगार हरजागा लाऊन देवावा ऐसे म्हणत होता. परंतु त्याचे बोलणे मात्रागमनी, इतबार काय? पुण्यास तो आल्यावर काहीं कळले नाहीं. तर ल्याहावे. हे विनंती.

¶*This is a private letter from Satara informing that the writer had his children vaccinated as a severe epidemic of small-pox was raging in the city.*

---

*No. 58*]

पौ छ १ जमादिलाखर.

**श्री.**

सेवेसी विज्ञापना. ताा छ २ जमादिलाखर मुकाम नंदवाड त्रितीय प्रहर स्वामीचे कृपेकरून वर्तमान येथास्तित आसे विशेष. दारकोजी जासूद आंबोजी कदम दिाा पिराजी सितोले याजबरोबर आज्ञा आली जे, मुकाम मजकुरी बैल व्याला, त्याची तहकीकात करून लिहोन पाठवणें. त्याजवरून जेथे बैल होता तेथे वीसपंचवीस भले लोकसुधा जाऊन पाहिला. बैल पाणियात बसला होता. दोन माणसे लाऊन उठविला. तो परम श्रमेकरून उठला. च्यार हात लांब जाताच मागती पडिला. प्रसुतकालचे भाव सारे त्याचे देही व द्वारी जाहाले आहेत. काही जारहि तेथे पडिला आहे. प्रसुत होते समई अणिक लोकानी बहुतानी पाहिला, त्याचेहि दाखले पाहिले. प्रत्यक्ष वासरासरिखे स्वेतें[१] होते. कान, डोले, पाय, सारे येथास्तित होते. परंतु जीव नव्हता. निराले होताच जवल कुतरी होती त्याणी खादले. तेथे रक्त पाचसात जागा पडिले आहे. सर्वांनी पाहिलेहि आहे व हाली पाहाता भावनाहि दिसते. परंतु न व्हायाची गोष्टी आहे. मिथ्या आसेल. बैलास वासरू कोठे होणार? याच समई राजश्री बाबा सरनाईक

---

१ पांढरे.

येथे आले आहेत. त्यासहि दाखव(ला) सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. गावची मोजदाद जाहाली. गुरे सारी मोजिली. दाण्याचा आजमास लिहिला असे. लोक आज्ञेप्रो नेमून ठेविले. आताच कूचहि केले हे विज्ञापना.

¶*This letter contains the news, given in detail, of an unnatural phenomenon, namely that of a bullock being delivered of a lifeless calf.*

---

*No. 59*]

पौ छ ४ सफर

वा येमाजी प्यादा.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी, विनंती. उपरी, घोड्याचा पटा मिनेदार करविला होता तो तयार जाहाला आसिला तरी पाठऊन देणे व जडावाचा पटा व दुंमची आहे तीहि पाठवणे. खोटे जवाहिराचा पटा व दुमची येक व खरे जवाहिराचा पटा दुमची येक, येकूण दोनहि जोडे पाठवणे. रा छ ३ सफर हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send certain articles, some of them being jewelled ones, pertaining to the equipment of a horse.*

---

*No. 60*] [*19-8-1764*

श्री.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. राजश्री खंडेराव वगैरे याजकडील पागा असिउंबरीस आहे ते हुजूर आणविली असे. त्यास, गुदस्तां घोडी खराब जाली आहेत. याजकरितां घोड्यास पंधरा दिवस तूप चारऊन कार्याकारण जीन सामान वगैरे सरंजाम करून देऊन कदीम लोक आहेत ते बारगीर वगैरे करार करून

१ घोड्याच्या शेपटीखालून जाणार बंद.

घोडी आपले नजरेने पाहून लस्करात निभावत असी असतील ती घोडी व उंटे व बैल पाठवणे. चौकसीने बंदोबस्त करून पाठवणे. जाणिजे. छ २० सफर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

पो छ १७ राखर सन खमस
सितैन आस्विन मास. घोडी रास
२४ रवाना केली छ ७ जाखर
बा (फाटले).

*¶The Peshwa asks Nana Fadnis to send on to the camp a certain detachment of horse after making the animals fit for service. Nana Fadnis is ordered to give to the horses a daily allowance of ghee for a fortnight.*

---

*No. 61]* *[26-12-1764*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी
जनार्दन स्वामी गोसावी यासी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. दाहा सेरो(सरा)[1]चा ढाल[2] पिवला अडीच तीन बोटे रुंद कासीचा व गेंद[3]जोड्या दाहा किरमेजी याचे प्रयोजन आहे. तरी दाल व गेंदजोड्या चांगल्या खाशा घोड्यायोग्य पाहून खरेदी करून पाठऊन देणे. सत्वर पाठवणें. रा छ २ रजब सुा खमस सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

पो छ ७ रजब सन खमस सितैन पौष. पो रवानगी बा
जासूद जथे लिंगोजी नाईक नागोजी सटवाजी व मल्हारजी
रघोजी दाहा सरोसराचा दाल व च्यार गेंदजोड्या पो असेत.
छ १३ रजबु रविवार.

*¶Raghunath Bajirao asks Nana Fadnis to send him certain articles pertaining to the equipment of a horse.*

---

१ घोड्याच्या साजापैकीं. २ पट्टा. ३ रेशमी तुरे.

5079

No. 62] [13-2-1764

श्री

पौं छ २० साबान आर्बा
माघ बा। जासूद बहिरजी वा।
शेकाजी जथे शिदोजी नाईक.

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी

विनती. उपरी, वसईहून सकलाद पुण्यास आली आहे, त्यापैकी सामान हतीचे :

| | |
|---|---|
| झुली | सिऱ्या |
| १५ | १० |

येणेप्रों पंधरा झुली व दहा सिऱ्या बेतून तयार करून लस्करास पाठऊन देणे. रा। छ १० साबान सु॥ आर्बा सितैन मया व अलफ. हे विनंती.

¶*The Peshwa, writing from the camp to Nana Fadnis in Poona, asks him to send some cloth covers and head-pieces for the elephants, made out of the broad cloth brought from Bassein.*

---

No. 63] [8-9-1764

पो छ २१ रोवल सन
खमस सितैन.

श्री

चिरंजीव राजश्री नारायेणराव यांसी माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष. फीलखान्याकडील सरंजाम :

| | |
|---|---|
| सकलादी लाखी | रेसमी गोंडे[1] फुंदणे |
| ५ झुली | वजन पक्के ८८१ |
| ५ सिऱ्या[2] झालरसुधा | |
| १० | |

येणेप्रो दाहा सुमारी व येक सेर वजन तयार करून सांडणी पाठविल्या आहेत यांजबरोबर पाठऊन देणें. सकलादी सामान येथे मिलत नाही, याजकरितां जलदीने तयार करऊन दसरियाचे आगोधर येथे येऊन पोहचे असे रवाना करावे. कदाचित सकलाद जामदारखानियात नसली तर खरेदी करून याच सांडणीवर पाठऊन देणे. सत्वर येऊन पोहचे ते करणे. रा। छ ११ रौवल सु॥ खमस सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

¶*The Peshwa asks his brother Narayanrao to send certain articles, made of silk and broad cloth, pertaining to the equipment of elephants.*

---

१ फुंदणा=गोंडा. २ शिरी=हत्तीच्या डोक्यावर टाकण्याचे सुशोभित वस्त्र.

No. 64] [10-3-1769

पौ छ १८ जिलकाद

तिसा वा देवजी व बावाजी

जासूद जथें कचोंर्जा नाईक.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी

विनंती. उपरी, पुण्याचे आसपास हतीकरितां उस लावावा :

| | |
|---|---|
| मौजे कोलवडीस | मौजे हडपसर |
| बिघे ३० | बिघे २० |

येणेप्रा दोन्ही गांवी पंनास बिघे उस लावणें. रा छ १ जिलकाद सुा तिसा सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa expresses his desire to Nana Fadnis that sugarcane, for the consumption of elephants, should be planted over 50 bighas of land in the vicinity of Poona.*

---

No. 65]

पौ छ १८ सवाल.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी

जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

पोष्य नारायणराव बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करीत जावे विशेष. शामा हरणाचे कातडे रंगऊन खंडोजी पंवार दिमत सिकारखाना याचे स्वाधीन केले आहे, त्याचे प्रयोजन आहे. तरी त्याजवरून कातडे घेऊन सत्वर पाठऊन देणे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Narayanrao Ballal writes to Nana Fadnis asking him to send the dyed skin of a black antelope.*

No. 66] [30-12-1768

पो छ १९ रमजान

तिसा पौष.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

विनंती. उपरी, सुरतेस शाहाणा माणोस पाठऊन बहिरी २ दोन व शाईन १ यो तीन खरिदी करून आणवणे. रा छ २० सावान सुा तिसा सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send a man to Surat to purchase three falcons.*

---

No. 67]

श्री

शेवेसी विज्ञापना. आम्हांकडील चित्याच्या गाड्या जायां जाल्या आहेत. त्यांजला धांवा घालावयासी कारिगर लोहार पाहिजे. त्यास, आपले सरकारांत आहे; दोन दिवस देविला पाहिजे. म्हणिजे गाड्या तयार होतील. व चांभार गाडी बांधणार तोहि देविला पाहिजे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*This paper contains a request for a blacksmith to prepare bullock carts for Cheetahs to hunt the deer.*

---

No. 68] [1809-10

श्री

यादी सरकारचे थटीकडील गुरे गुा
त्रिंबकजी डेंगले सुा आशर मया तैन व अलफ

सुमारी

१० गाई
१३ काल्हवडी
१४ गोऱ्हे

१३ किता
१ पंचकल्याण गोऱ्हा येक बाबुराव कात्रे यांजकडून आला.

---

१४

---

१ बहिरीचीच एक जात.

६ पारड्या
२ रेडे
७ बैल सर
५ म्हसी

१७

तपसील :

पुणे मुकामी दुभती व गाभणी सुमारी | चारणीस पाठवावयाची भाकडी वगैरे

५ गाई दुबल्या
३ गाई कालहवडी गाभण्या
५ म्हसी
  ३ दुपत्या
  २ गाभण्यां

  ५

३ पारड्या गाभण्या
२ बैल सर
२ गोऱ्हे
२ रेडे.

¶*A list of the state cattle of the Peshwas is given here.*

---

*No. 69*]

**5. Ornaments and Jewellery.**

५

**श्री**

सेवेसी बालाजी जनार्दन कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। छ २० जाखरपर्यंत यथास्थित असे. यानंतर, हिऱ्यांचे मालेस मुकेसाच्या गंडेऱ्यामध्यें बांधावयास गणेश हरि यांस सांगितलें आहे, त्याप्रा माल बांधोन सांडणीस्वाराबरोबर पाठऊन देणे म्हणोन आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणे माल बांधोन साकरू खिजमतगार याजबरोबर कालच गणेश हरि याणी सेवेसी पाठविली आहे. शेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis informs the Peshwa that the diamond necklace with the desired improvement in its structure has already been despatched.*

---

१ जर्तारी.

No. 70] [19-12-1762

पो छ ४ जाखर

सलास.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

विनंती. उपरी, स्मरणी तेरा मोत्यांची पाठऊन देणें म्हणौन तुम्हांस आज्ञा केली होती त्याजवरून तुम्ही जवाहिरखानापैकी स्मरणी पाठविली तिची किंमत रूपये :

४८०० मोत्यें दाणे १३ एकूण.

·|||· सोने मूत वजन ८||१||·

४८०० |||·

येकूण अठेचालीससें पाऊण रूपयांचे किमतीची तेरा मोत्यांची स्मरणी पाठविली ती स्वारींत जवाहिरखान्याकडे जमा जाहाली असे. रा छ २ जमादिलाखर. हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis, acknowledging the receipt of a rosary composed of thirteen pearls, worth Rs. 4,800-12-0.*

---

No. 71] [28-1-1764

पो छ २७ रजब

सन आर्बा सितैन.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, चिरंजीव राजश्री नारायेणराव यांस अंगठी हिऱ्याची फिरंगोजी खेडकर खिजमतगार याजबरोबर पाठविली आहे. घेऊन पावलियाचे उत्तर पाठवणे. जवाहिरखान्यात च्यार आंगठ्या जब्याजवळ दिल्या आहेत त्या तयार करून सत्वर पाठवणे. रा छ २४ रजब सुाा आर्बा सितैन मयां व अलफ. हे विनंती.

¶*The Peshwa sends a diamond ring for his brother Narayanrao.*

No. 72] [26-8-1764

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. रत्नशाळेपैकी नारोबा गाडगीळ शागिर्द याचे तसलमातीस दक्षणावर्त शंख देवपूजेत होता तो साळगुा शागिर्दाजवळून हारवला. त्याची किमत शंख सोनेमोतीसुधा याजवळून गुन्हेगारीदाखल रुपये ६० साठ करार करून रोख पोता वसूल घेतले असेत. तर शंख याचे तसलमातीस आहे तो हारवला, सबब खर्च लिहिणे. रा छ २७ सफर सुाा खमस सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao reports to Nana Fadnis that Rs. 60 have been recovered from a Brahmin servant as the price of a right-side conch-shell lost by him.*

---

No. 73] [10-12-1766

पो छ १२ रजब सन
सबा सितैन बाा सांडणी-
स्वार आबूब.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसांवी यासी

विनंती. उपरी, खासे कंठीस हिऱ्याची धुगधुगी होती तो हिरा उखलला. याजकरिता आबूबमाा सांडणीस्वार याजबाा धुगधुगी व हिरा पाठविला आहे. तर जवाहीरखान्यांत देऊन जलदीनें जडऊन याच सांडणीस्वाराबाा पाठऊन देणे. व झग्यांचे संज्याबास[1] दर्याई येक हिर्वी व पिवळी व लाल येणेप्रों तीन व रेसीम उदी व पारवे दोन रंगाचे पाठऊन देणे. रा छ ७ रजब सुाा सबा सितैन मयां व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis about some repairs to be effected for his necklace.*

---

१ किनारीस.

No. 74] [19-12-1766

पो छ २१ रजब सन
सबा सितैन बा। हयातखान
सांडणीस्वार व मुराद.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

विनंती. उपरी, पाचेची धुकधुकी पाठविली आहे. इचा सिरपेच फुलासारिखा भवते हिरे लाऊन तयार करून पाठवणे. जरी सरकारात हिरे नसिले तर विकत घेऊन सिरपेच उतम फुलाचा करऊन पाठऊन देणें. सोन्याचा तोडा तरतेरे हिरे लाऊन करविला आहे तोहि तयार करून, सदरहू दोन्ही दागिने पाठऊन देणे. चोकड्याविसी पेशजी लिहिलेच त्याप्रा। चोकडा तुरमुनी गुळवा रंगाचा पाठवणे. रा। विठल विश्राम याजबाबत दुरबीन लाहान तेथे राहिली आहे तेहि पाठवणे. मुरादखान सांडणीस्वार दि। पागा हुजूर पा। आसे. रा। छ १६ रजब सु॥ सबा सितैन मया अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send certain jewelled ornaments and one small spyglass for his use.*

---

No. 75] [5-1-1767

पौ। छ २२ रमजान
माघ मास.
पौ। पुणे फाल्गुन शुध्द
४ सन सबा.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
बाळाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी,

पो। रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष. बालसेट सोनार चाकर सरकार याणें सरकारचा हिरा गमाविला. सबब त्याची बायेकोमुलें पुणियात आहेत ती कैद करून आनंदवलीस रा। केशो गोविंद याजकडे पाठऊन देणें. रा। छ ४ शाबान सु॥ सबा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao asks Nana Fadnis to imprison the wife and children of one Balset, a goldsmith, who had lost one state diamond.*

No. 76] [7-3-1767

पौा छ ९ सवाल फाल्गुन.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री

बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी.

पोष्य नारायणराव बलाल नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणे विशेष. तुम्ही पांच वाळ्या सोन्याच्या व कंठी पाठविली ती पावली. आज सिनरचा मुकाम आहे. उदईक नासिकचा मुकाम आहे. सोमवारी अथवा मंगळवारी गंगापुरास जाऊ. तीर्थरूप राजश्री रावसाहेबाकडील वर्तमान तुम्हांस कळत असेल ते हमेशा लिहीत जाणे. हिंदुस्थानाकडील वर्तमान तर तीर्थरूप सबलगडास आले. उजेनीस येणार म्हणून वदंता आहे. रवाना छ ६ सवाल. बहुत काये लिहिणे हे विनंती व मुर्गी कातर पाठविली ती पावली हे विनंती.

¶*Narayanrao Ballal writes to Nana Fadnis asking news of Madhavrao and acknowledging receipt of some valuable articles sent.*

---

No. 77] [11-9-1767

पौा छ १९ राखर
समान भाद्रपद वा
येमाजी.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गो,

विनंती. उपरी, पुण्यांत स्वारी असतां पाचेचे मणी विकावयास आले होते ते माहाग पडतात सा न घेतले. परंतु मेळास बरे आहेत. त्यास, फिरून शोध करून गवेस आले तर घ्यावे. ज्यापक्षी पहिले किमतीस नच उतरे, तेव्हां अधिकआगळे करून खरिदी करून पाठऊन देणे. रा छ १७ राखर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis, asking him to purchase and send some emeralds for him.*

5087

No. 78] [22-9-1767

पौ छ २ जौवल समान

आश्विन वा मल्हारजी.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी,

विनंती. उपरी, पाचेचे मणी पुण्यांत पाहिले होते ते खो करून घेणे म्हणून पूर्वी लिहिले आहे; त्यास, मणी घेतलेच असतील. कदाचित घेतले नसेल तर घेऊन पाठऊन देणे. हिरयाचे ताईत चांगले सुमार ५० पंनास फार चांगले पुण्यांत तलाश करून जे मिलतील ते घ्यावे. बाकी शहरास लिहून आणवावे. रा छ २८ राखर सुा समान सितैन मया व अलफ. हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send 50 diamond ornaments of a particular kind.*

---

No. 79] [4-3-1769

पौ छ ६ जिलकाद तिसा

फाल्गुन वा संकराजी रघूजी

जथे बयाजी.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी,

विनंती उपरी. मोत्यांचा चौकडा तीन हजार रुपयांचे किमतीचा पाहिजे. त्यास, सरकारांत सिल्केस असल्यास शोध करून पाठवणें. सिल्केस नसल्यास तीन हजार रुपयास चौकसीने खो करून पाठऊन देणे. सिल्केचा पाठवाल तर तीन हजार किमतीचाच असल्यास पाठवणे. नसल्यास तीन हजाराचा चांगला खो करून पाहून पाठवणे. रा छ २४ सवाल. खरा तिही हजाराचा चांगला पाठवणें. वहुत काये लिहिणे? हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send a certain pearl ornament, called chaukada (the square) worth Rs. 3,000.*

No. 80]

पौा छ १७ रमजान सबेन

बा कार्साद जथे रायमल

१ भागमल १ राजाराम

—

२

श्री.

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी

विनंती. उपरी, माणकांचा सिरपंच मधी हिरा व भोंवती माणके तारेनं बांधिली आहेत तो स्वारीसमागमे आला नाहीं तो व आणखी दागिने स्वारीसमागमे आणावयाचे तयार करविले होते ते तयार जाले असिले तर लस्करांत पाठऊन देणे; व कापडाविसी पेशजी लिहिलें आहे त्याप्रेंा लौकर रवानगी करणे. नीलाची मूर्ति जवाहिरखान्यांत माणिराम पाथरवट याजकडून करविली आहे ती त्याणे चांगली केली असली तर उतम जाहालें. त्याच्यानें चांगली न होय तर बखतरायाकडून चांगली करवणे. मधी तुम्ही दोन वेळा मूर्ति पाहून चांगली सिरा[1] मूर्ति होय असी तयार करवणे. रा छ ४ रमजान. बहुत काय लिहिणे ही विनंती.

¶*The Peshwa writing from camp, asks Nana Fadnis to send certain jewelled ornaments to him.*

---

No. 81] [20-1-1770

पौा छ २३ रमजान

पौष मास.

श्री.

सेवेसी बालाजी जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ २२ रमजानपर्यंत येथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री नारायेणरावसाहेब यांस कंठीकरिता मोत्ये खरेदी करून पाठवणे म्हणौन पेशजी लिहिले होते. त्यास, मोत्ये खरेदी न करणे म्हणौन आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणे खरेदी करीत नाहीं. सिंद्याबाबत माल आली आहे त्यापैकीं कंठीची मोत्ये निवडून पाठवणे म्हणौन आज्ञा. त्याजवरून कंठी मोत्याची सिंद्याबाबत जवाहीरपैकीं दागिना १ येक फाजलखान सांडणीस्वार दिमत पागा हुजूर याजबरोबर पाठविली आहे.

---

[1] सिरा = उत्तम. नीलाची मूर्ति म्हणजे काय? नील मणीची ?

शहतीची याद अलाहिदा आहे. शेवेसी प्रविष्ट जालियावर उतर पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. शिंद्याकडील मोत्यांत चांगलीं होतीं तीं निवडून पाठविलीं आहेत, परंतु वाईट आहेत. देहनगीस कामास येतील. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis writes to the Peshwa about the pearls intended for Narayanrao's necklace.*

---

No. 82] [Recd. 22-1-1772

पौ छ १६ शौवाल

सुा इसने सबैन.

**श्री.**

यादी कंठी, धुगधुगीस[1] हिरा तरतेरा[2] दोहीकडून खुला व लोलक तरतरा, मालेस मोत्यें. गंडेरीदार ऐसी कंठी आहे ती पाठऊन देणे. दागिन्यात नसलियास कोठे आहे तिचा शोध लाऊन पाठवणे म्हणोन आज्ञा. त्यास, कंठी जवाहीरखान्यात आहे. लोलक हिरा सन आर्बा सितैनात श्रीमंत राजश्री राव यांचे कंठीस लाविला. त्याआलीकडे सौ रमाबाई याजकडे कंठीस आहे. बाकी धुगधुगी व मोत्ये कंठीस- लोलक मोतीं याप्रमाणे आहे.

¶*This paper refers to a certain pearl necklace. The details of its design are given.*

---

No. 83] [30-8-1771

पौ छ २४ जौवल

सन इसने सबैन.

**श्री**

शेवेसीं रामचंद्र नारायेण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम तागायेत छ १९ जौवल मुकाम मौजे गंगापूर येथास्थित जाणून स्वकीयें

---

१ ? २ पैलू पाडलेला.

5090

कुशल लिहीत जावें विशेष. तुकोजी बागुल व बहिरजी बांदेला जासूद जथे सखोजी नाईक याजबरोबर जवाहीरखान्याचीं वजनें नवीं तोलेवार:

| | |
|---|---|
| २४ | सेंर |
| १२ | आदसेंर |
| ६ | पावसेंर |
| ३ | तीन तोले |
| २ | दोन तोले |
| १ | येक तोला |
| ॥ | अर्धा तोला |
| ४८॥ | ७ |

येणेप्रा। सात वजनें व कागदाचे दस्ते मोहरदार २ पावले. व नारो कान्हो ठोंसर याजबरोबर मोमबत्या सुमार १०० शंभर पाठविल्या पावल्या. विदित होवे बहुत काये लिहिणे, कृपा लोभ असो द्यावा, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore acknowledges the receipt, among other things, of seven new weights, of various denominations, for the Jewellery Department.*

---

*No. 84*] [*1772?*

श्री

सेवेसी विज्ञापना.

हिरे घासावयाची सहाण पेसजी ईश्वरदासानी येथून नेली होती त्याचे दुपटीनें थोर विकाऊ रा मोरो विश्वनाथ यांचे मारुफातीनें आहे. त्याणी हुजूर ल्याहावयास सांगितले त्यावरून पेशजी सेवेसी विनंतीपत्र लि॥ होते. हलीहि मोरोपंत उतर पुसत असतात, आज्ञा होईल त्याप्रमाणें सांगोन. नाही तर दुसरा घेणार आहे त्यास देतील.

बेलापुरास सालगु॥ इंग्रजानी भाताचे साटे वृंदावनदास याचे मारुफातीने केले होते, त्याविशी जनरलानी लेहून पाठवावयाबद्दल सांगितले होते याजकरितां पेशजी लिहिले होते. त्याचे उतर आले कीं नाहीं म्हणोन जनरालाची भेट होते ते समई पुसत असतात. यास्तव उतराची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत.

येणेप्रमाणे विदित होणे. हे विनंती.

¶*Reminders, probably from the Peshwa's agent at Bombay, are sent on two subjects, viz. the purchase of a polishing stone for diamonds, and the store of rice at Belapur.*

No. 85]

पौा छ ८ रमजान.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य रो
गोपालपंत दाजी स्वामीचे सेवेसीं

पौा नारो नीलकंठ साा नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल ताा छ १८ साबान मुा नासिक जाणून स्वकीयें कुशललेखन करीत गेलें पाहिजे. विशेष कृपा करून पत्र पालें ते पावोन संतोष जाला. यैसेच निरंतर पत्री सानंदवीत जावें. श्रीमंतानी साबूचे तांदलाकरितां आपणाकडून सूचनार्थ लिहविले म्हणौन लिा. त्यास, पेशजी साबूचे तांदूल पाले होते. त्याउपरी येथून जोडी कोणी आली नाही. परस्पर पुण्याहून जातात. राजश्री मल्हारपंत तात्या लौकरच येणार त्यांजबाार साबूचे तांदूल, सुकेले व केंशर वगैरे फर्मास पाठवितों. रक्तचंदनाचे बीज येथे मिलत नाही. शहरास सांगून पाठविले आहे. तेथून आल्यावर पाठऊ. राा यादोपंत गवांदे याचे पत्र त्याचे घरी लिा प्रो पावतें केलें. सदैव कृपापत्री सानंदवीत जावें. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ कीजे, हे विनंती. पेशजी खिंकणेलें[1] व साबूचे तांदूल येथून पाले ते पावल्याचे उतर पाठवावें. हे विनंती.

¶*Naro Nilkanth writes from Nasik to Gopalpant that he would shortly send saffron, sago and other articles for the Peshwa.*

---

No. 86]

पौा छ २३ रजबु.

श्री

राजश्री गणेशपंत दाजी स्वामीचे शेवेसी, पौा त्रिंबक कृष्ण साा नमस्कार विनंती. उपरी, आपणांस व चिरंजीवांस तुमचे फानूस[2] करवणे म्हणून सांगितल्यास पंधरा दिवस जाहाले. तर तयार जाहाले असले तर बरे. नसले तर रात्रीचा कारिगर बसऊन तयार करोन आज गंगाराम सुतारास बोलाऊन आणून चांगले आरसे कल्हईदार आणून मेजाचे कापून लाऊन उदईक प्रातःकाली रवाना करणे. न केल्यास श्रीमंतांस राग बहुत येईल. हे विनंती.

¶*Trimbak Krishna reminds Ganeshpant about sending quickly a lantern, fitted with mirrors, for which, he adds, the Peshwa has waited long.*

---

१ खिंकणेल = पिलूच्या झाडाच्या फळापासून काढलेलें तेल.

No. 87]

श्री

सेवेसी रामचंद्र नारायेण कृतानेक सां नमस्कार विनंती. पिळाजी चावट खिजमतगार याजबरावर फटाके व बोथाव्या व कातर सुरी पाठविली त्याचे उतर श्रीमंत राजश्री नारायेणरावसाहेब याणी लिहिले आहे त्याजवरून कळलेच असेल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan acknowledges the receipt of a knife, crackers and some other articles sent from Poona.*

---

No. 88] [16-6-1764?

पौ छ १८ जिल्हेज.

श्री

शेवेसी नारो आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. पुण्यातील वैद्य-खाना विसाजी राम यांचे निसबतीस आहे, त्यापैकी औषधाचे पेटारे पुरंधरास आणावयाकरितां निवडून ठेविले आहेत, त्यास बोझ्यास कामाठी देऊन रवाना करणे व एक चहादाणी जवाहीरखानापैकी पाठवणे म्हणोन आज्ञा; त्यास, आज्ञेप्रमाणें पेटारेयाचे बोझ्यास च्यार कामाठी देऊन व एक जासूद समागमे देऊन रवाना केले आहेत, व च्याहादाणी जवाहीरखान्यांत नाहीं. सिहीगडास गेली आहे तेथून आणविली आहे. आल्यावर पाठवितो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Naro Appaji acknowledges the receipt of a letter, asking him to send certain medicine-boxes and one tea-pot to Purandar.*

---

No. 89] [27-9-1764

पा छ ११ राखर सन
खमस सितैन
बा सांडणीस्वार.

श्री

चिरंजीव राजश्री नारायेणराव यांसी माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. दसरियाकरितां तुम्हांस पोशाक सांडणीस्वाराबराबर पाठविला असे. त्याची याद अलाहिदा आहे त्याप्रो पावल्याचे उतर पाठवणे. रा छ १ राखर. हे आसीर्वाद.

¶*The Peshwa sends to his younger brother Narayanrao a dress for the occasion of the Dasara.*

No. 90] [12-8-1764

पो छ २८ सफर
सन खमस सितैन.

श्री

चिरंजीव राजश्री नारायणराऊ यांसी माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष. ब्राह्मणोदक गुलाब जिनसखान्यांत आहे त्यपैकी वजन पके पांच सेंर तुंगांत[1] घालून कामाठियाजवल देऊन पाठऊन देणे व पेशजी जिनस तेल वगैरे आणविल्याप्रों रवानगी केली असेल. नसेल रवानगी केली तर पत्र पावतांच रवाना करणें. स्वारीसमागमे स्वयंपाकाची वगैरे भांडी आहेत ती जीर्ण(?) जाली व पुण्यातही सिलकेस फार नाहीत. याजकरितां जी उपयोगी भांडी त्याची यादी गोविंद कृष्ण गोखले याजपासून लिहून कल्याणास रामाजी माहादेव यांसी लिहून भांडी लवकर तयार करून पुण्यास आणवणें; या कामास येक कारकून नेहेमी पाठऊन भांडी तयार करून आणावी. जुनी भांडी कावेल[2] उपयोगी नाहींत. असी कोठीस असतील ती कल्याणांस पाठऊन नवी भांडी करून आणावी रा छ १३ सफर सुा खमस सीतैन मया व अलफ. हे आसीर्वाद.

¶*Madhavrao Ballal asks Narayanrao to send him rose-water and certain other articles.*

---

No. 91] [23-11-1764

पो छ १९ जाखर
सन खमस मार्गिसीर्ष
बाा लक्षुमण वाा तुकोजी
व जावजी जथे नारोजी
नाईक.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, पोशाखी सनगांचें प्रयोजन आहे. ऐशास, मुलतानी छिटें बंगाली मलमल व जामदान्या बंदरी छिटें याचें निमोन्यास रेजें येथून पाठविले आहेत. याप्रों जामदारखान्यांत सिलकेस असतील तर शोध करून

---

१ बुदली, चंबू. २ कावल म्हणजे जुनें जळून गेलेलें भांडें.

जीं असतील तीं पाठऊन देणें. नसतील त्याचा पुण्यांत शोध करून खरेदी करून पाठवणें. नच मिलेत तर औरंगाबादेस कागद व निमोने सांडणीस्वाराबाा पाठऊन तेथून सदरहू सनगाप्रो तींहीं प्रकारची सनगे शहरातून खरिदी करून आणून सत्वर पाठवणें. राा छ २८ जोवल. निमोन्याचे रेज्याची याद पाठविली आहे त्यावरून कलेल. राा छ २८ छं मार. बहुत काये लिहिणे, हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send some pieces of cloth, of three particular varieties, after having got them purchased from Aurangabad in case they were not available in Poona.*

---

*No. 92*] [*15-12-1764*

पौ छ २७ जााखर
मार्गसीर्ष मास.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बालाजी जनार्दन स्वामी गो।

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. दांताचे औशधाचे प्रयोजन असे. तरी दांतास औशध लाविल्यानें दांत काले न होत आणि दात बरे होत ऐसे औशध वो राा मोरोबा वैद्य याजकडून करऊन सत्वर हुजूर पाठऊन देणे व लाक्षातेलाविसी पेशजी लिहिले आहे त्याप्रमाणे उतम तेल करऊन सत्वर रवाना करणे. राा छ २१ जमादिलाखर सुाा खमस सितैन मया व अलफ हे विनंती.

¶*Raghunathrao asks for a dental application prepared by one Moroba Vaidya. "The medicine," Raghunathrao writes, "should be such that it should cure the teeth without black-staining them".*

---

*No. 93*] [*28-2-1765*

पौ छ २७ रमजान
फाल्गुन मास.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यासि,

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. सरकारात कमच्याचे[१] प्रयोजन आहे. तरी

---

१ कमची=A switch.

पंचवीस कमच्या इंगरेजी हुजूर सितावीने पाठवणे. रा छ ७ रमजान सु॥ खमस सितैन मया अलफ. बहुत काये लिंहिणें. कमच्या तयार असल्या तरी उत्तम. नाहीतर (त)यार करून आगर मुंबईहून आणून पाठवणे व वेताच्या छड्या शंभर पाठवणे. छ मजकूर. हे विनंती.

¶*Raghunathrao asks Nana Fadnis to send twenty-five English switches and one hundred canes.*

---

*No. 94*] [*1-4-1765*

पौ छ १ जिल्काद खमस
वैशाख. वा॥ यमाजी.

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यांसी

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणे विशेष. खासगीत नेसावयासी धोत्रजोडे पैठणी पाहिजेत त्यास, येथून धोतर मासल्यास पाठविले आहे याप्रमाणे सूत व रेसीम या प्रतीचे लांब हात दाहा व रुंद हात सवादोन येणेप्रमाणे पुण्यात मिळतील तर धोत्रजोडे १० दाहा खरिदी करून पाठऊन देणे. पुण्यात न मिलत तर पैठणाहून आणऊन पाठवून देणे. रा छ १० सवाल. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send ten pairs of dhotis, of Paithan manufacture, required for his personal use.*

---

*No. 95*] [*4-12-1766*

पौ छ १२ रजब सन
सवा सितैन वा॥ आ-
बूवमा सांडणीस्वार.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, खासे धोत्रजोडे पैठणी जरीच्या कांठाचे कांठास वेल याप्रो निमोणा कागदावर लिहून दिल्हा होता त्यापौ काही तयार होऊन आले आसिले तरी पाठवणे व पुण्यातहि सावकाराजवळ असतील तर आणून खरिदी करून पाठवणे. तूर्त येक दोन जे मिलतील ते पाठवणे. रा छ १ रजब सु॥ सवा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send some pairs of dhotis bordered with gold and silver thread-work.*

No. 96] [30-12-1766 ?

पौो छ १३ साबान

सन सबा.

श्री

शेवेसी बगाजी रघुनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २७ रजबु-पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्तित असे विशेष. स्वामीची आज्ञा की, दरमाहा दाहा लेखण्या करून पाठवाव्या. त्यास आज्ञेप्रमाणे माहे रजबच्या दाहा लेखण्या चांगेल्या करून पाठविल्या आहेत. त्या प्रविष्ट जालियावर उतर पाठवावयासी आज्ञा केली पाजे. पुढे दरमाहा लेखण्या पाठविल्या पाहिजेत; त्यास, येथे बोरुची पेरी अगदी नाहीत. त्यास जासुदजोडी येक अथवा सांडणीस्वार याजबाा शंभर पेरी चांगली पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे. म्हणजे सदरहूप्रो दरमाहा लेखण्या प्रविष्ट करीन. दाहा लेखण्या पाठविल्या आहेत, त्यास पेरी चागली नव्हती, याजकरीता स्वामींनी रागे न भरावे. नलकुटी दोन बासाची चांगली पनास लेखण्या आत राहिसी पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणजे आज्ञेप्रो लेखण्या करून सेवेसी पाठवीत जाईन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

¶*Bagaji Raghunath writes that, as instructed, he will be regularly sending ten reed-pens every month if the reed sticks are sent him.*

---

No. 97] [7-12-1768

पौा छ २९ रजबु तिसा

मार्गसीर्ष बाा फतेअली

सांडणीस्वार.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी

विनंती. उपरी, चिरंजीव राजश्री नारायणराव यांजकरितां पोशाकास पैठणी दुपटे, तीन हात रुंद व पांच हात लांब, याप्रों पदरास जर आसवली अथवा

नारली पदराची अथवा साधी आठ बोटे साहा बोटे व किनारा जाफरखानी[1] धंडीदार[2] अथवा आसवली अगर नकसी याप्रों सनगे :

२ लाल
२ बनोस
२ गुलाबासी
२ हिर्वा
२ केशरी

१०

येकून दाहा दुपटे लिहिल्याप्रों जामदारखान्यांत असल्यास पा. नसले तर नवे पाहून खा़ो करून पाठऊन देणे. रा छ २६ रजब सुा तिसा सितैन मया व अलफ पाहून पाठवणे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa orders ten pieces of cloth of different varieties, which are mentioned in the letter, for the dress of Narayanrao.*

---

*[25-12-1768*

*No. 98]*

पौ छ १९ साबान
तिसा मार्गसीर्ष.

**श्री**

**पुा श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी**

विज्ञापना ऐसीजे. आज्ञापत्र सादर जाहालें तेथें आज्ञा कीं, अननासांचें प्रयोजन हुजूर असे. तरी वसईपैकीं च्यार दिवसांआड आठदाहा पाठवीत जाणे म्हणोन. त्यावरून आज्ञेप्रो रवानगी करीत जावी म्हणौन वसईस सेवकाने लेहून पाठविले आहे. सेवेसी रवानगी होत जाईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

[ पत्राचे मागील बाजूस "हे विज्ञापना" हीं अक्षरें आहेत. ]

¶*The Peshwa is informed that, as desired by him, about ten pine-apples, from Bassein, would be regularly sent to him at the interval of every four days.*

---

१ जाफर=केशर.
२ धडी=काठ.

No. 99] [20-1-1769

पो छ २२ रमजान तिसा
बा। फतेअली व आरब मा।
सांडणीस्वार.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी,

विनंती. उपरी, सरकारांत खासे धोत्रजोडे अगदीं नाहींत. त्यास, पैठणी धोत्रजोडे दाहा दर लांब हात अकरा साडेअकरा व रुंद पावणेतीन हात याप्रों सांडणीस्वारावा। पाठऊन देणे. व कस्तुरी उंच पांच तोले व आसमानी रंगाचे रेसीम दाहा तोले याप्रों पाठऊन देणे. रा। छ ११ रमजान सु॥ तिसा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send ten pairs of dhotis for his personal use and also five tolas of musk and some silk-thread.*

---

No. 100] [10-3-1769

पौ छ १८ जिलकाद तिसा
फाल्गुन बा। देवजी व बावाजी
जासूद जथे कचोजी नाईक.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी.

विनंती. उपरी, तिगस्तां तुमचे घरी मेजमानी जाली तेसमई पागोटें रंगीन केलें होतें. रंग बहुत खुष जाहाला होता. त्या तऱ्हेची पागोटी दोन तीन कारेगर लाऊन तयार करून पाठऊन देणे. व पैठणी हिर्व्या रंगाची तिवटे पोशाकी लांब पंचेतालीस हात याप्रों हिर्वा रंग चांगला गहरा असी पाच तिवटे पाठवणे म्हणौन पेशजी तुम्हांस लिहिले होते. ते पत्र पावले कीं नाहीं कलत नाहीं. पुण्यात असल्यास पा. नाही तर पैठणास लिहून लिहिल्याप्रा। तिवटे चांगली सूत बारीक असी पाठऊन देणें. रा। छ १ जिलकाद. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send some turbans of the description given in the letter.*

No. 101] [18-3-1769

पौ छ १८ जिलकाद
तिसा फाल्गुन बा।
भिकनखान सांडणीस्वार.

श्री.

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, तुम्ही रंगीन पोषाक दोन, येक नाफरमानी[1] व येक केशरी, ऐसे पाठविले ते पावले. ऐशास, दोनहि रंग प्रस्तुत पसंद नाहीत. त्यास या रंगाचे पोषाक हरगीज[2] न करावे. पेशजी लिहिलें आहे कीं, तुमचे येथें मेजवानीस पोषाकी तिवट केले होतें त्याप्रों दोन तीन पोषाक तयार करून पाठऊन देणें. रा। छ ९ जिलकाद सुा। तिसा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa expresses his disapproval of the gaudy coloured garments sent to him and asks the addressee, Nana Fadnis, to send others of a different variety.*

---

No. 102] [पो 27-3-1769

पो छ १८ जिलकाद
तिसा.

श्री.

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. गंगापुरी खाशांचे उपयोगी साकर चिनी सफेद मिलत नाहीं याजकारितां पांढरी खाशी साकर वजन पक्के ८२ दोन मण व कोकंबसालें वजन पक्के ८१ एकूण तीन मण उंटे माघारी येतील याजबराबरी पाठऊन द्यावी. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore asks for fine white sugar for the use of Gopikabai at Gangapur.*

---

No. 103] [6-4-1769

पौ छ ७ जिल्हेज तिसा
चैत्र बा। रुस्तुमखान
सांडणीस्वार.

श्री.

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गो-
सावी यासी,

विनंती. उपरी, सोवल्यांत पांवरावयास दुपटे धुवट लांब सात हात व रुंद तीन हात याप्रों येक पटी मधीं सिवण नाही असे बारीक चांगले मुलाईम[3] दोही

---

१ जांभळा. २ बिलकूल, कधींहि. ३ मऊ.

पद्रांस मात्र गोल जर तीन बोटे रुंद काठास जर नसावी अशा तरेचे पाचसात चंदेरीचे अगर जैनाबादी याप्रों अगर शाहागडी अथवा पैठणी यांत जे मिलतील ते परंतु बारीक व मुलाईम याप्रो पाठऊन देणे. व गुलाबी चंदन चांगला येक सेर दोन सेर फार चांगला मिलेल तो पाठऊन देणे. रा छ २८ जिल्काद. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send some pieces of cloth of a particular description mentioned in the letter.*

---

*No. 104*] [*2-8-1771*

पौ छ २७ राखर

इस्ने सबैन आपाद.

**श्री.**

आसीर्वाद. उपरी, तुम्ही पत्र पाठविले ते पावलें. गंधकाचा अर्क राजश्री बालाजी नाईक भिडे यांचे घरी होता तो कुपीत घालून पाठविला तो पावला. रा छ २० रबिलाखर. पावसाली टोपी स (क) लादी दुरंगी सकलादीची करून पा म्हणौन पेशजी लिहिले आहे, त्याप्रों व येक सुलतानी सकलादीची याप्रो दोन टोप्या करून जलद पाठऊन द्याव्या रा छ मजकूर. हे आसीर्वाद.

¶*The Peshwa acknowledges the receipt of a phial containing sulphur extract and asks for two caps made of broadcloth, one of them to be rain-proof.*

---

*No. 105*] [*5-4-1773*

पौ छ १६ मोहरम

सुा सलास सबैन.

**श्री**

**अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री**
**नारो आपाजी गोसावी यांसि**

सेवक नारायणरावं बलाल प्रधान नमस्कार. सुा सलास सबैन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. परसू वागमारा खिजमतगार याजबराबर दुर्बीन पाठविली ती पावली. जाणिजे. छ १२ मोहरम. बहुत काय लिहिणे.

¶*The Peshwa, Narayanrao Ballal, informs Naro Appaji that he has received the spyglass sent with a servant.*

No. 106]

श्री

विनंती मीर आनवर. सावली पाहून तसबीर काढावयाची पेटी इंग्रेजाकडलि आणिली होती ती आपण सरकारात मागावयास पाठविली, त्याजवरून शोध करून आपणाकडे नवलोजी चव्हाण याजसमागमे पा। आहे. घ्यावी आणि पावती द्यावी. जमा सरकारात धरिली आहे. इग्रेजाचे नावे खर्च लिहिवितो. उतर पा। हे विनंती.

¶*This paper refers to some crude photographic camera bought from the English.*

---

No. 107]

श्री

राजश्री नारोपंत चक्रदेव स्वामीस

विनंती. उपरी, भगवंतजी चव्हाण खासबारदार दिमत संताजी धसला याजबोर चंबू शाई भरून पाठविला आहे. त्यास बहुत सावधपणे खर्च करणे. आठा दिवसी खर्च जालियावर चंबू पाठवणे म्हणजे आणखी शाई भरून पाठऊ. आज कूचकी मुकाम ते लिहिणे. रा. छ २४ रमजान. बहुत काय लिहिणे हे विनंती. *

¶*The writer sends to Naropant Chakradev a small pot filled with ink.*

---

No. 108] [26-8-1799

श्री

यादी जिनस वसईहून रा। पुणे
सु॥ मयातैन व अलफ छ २४
रोवल श्रावण वा। १० इंदुवासरे सुमार:

| | अजसुमार | केळीं | नारळ | सुपारी | पाने | महाळुंगे |
|---|---|---|---|---|---|---|
| बाबासाहेब | ८०७ | १०० | ५ | २०० | ५०० | २ |
| आपासाहेब | ८०६ | १०० | ५ | २०० | ५०० | १ |
| रावसाहेब | ८०६ | १०० | ५ | २०० | ५०० | १ |
| बाळाजीपंत पटवर्धन | ४०२ | ५० | २ | १०० | २५० | ० |
| राघोपंत गोडबोले | १७५ | २५ | ० | ५० | १०० | ० |
| बळवंतराव नागनाथ | ५५२ | ५० | २ | १०० | ४०० | ० |
| दादंभट खरे | ३७६ | २५ | १ | १०० | २५० | ० |
| | ३९२४ | ४५० | २० | ९५० | २५०० | ४ |

* नारोपंत चक्रदेव पेशव्यांचा सरदार, नानाफडणिसाचे वेळचा.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| सो· यसूने पो | | | | | | |
| सौ वहिनीबाई | १७६ | २५ | १ | ५० | १०० | ० |
| सौ सीताबाई | १५० | २५ | ० | २५ | १०० | ० |
| ताई वोकीण | ९५ | २० | ० | २५ | ५० | ० |
| काकूबाई | ९५ | २० | ० | २५ | ५० | ० |
| श्रीमंत बापूसाहेब | १४५ | २० | ० | २५ | १०० | ० |
| सौ गुंजाबाई | ९५ | २० | ० | २५ | ५० | ० |
| | ४६८० | ५८० | २१ | ११२५ | २९५० | ४ |
| नारोपंत चक्रदेव | २०१ | ५० | ० | ५० | १०० | १ |
| | ४८८१ | ६३० | २१ | ११७५ | ३०५० | ५ |

¶*This is a list of articles sent from Bassein to Poona to different persons.*

---

*No. 109]* *[10-6-1767*

पौ छ १३ मोहरम

समान सीतैन

श्री

आपल्ये नारयेणराव साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा छ १२ मोहरमपर्यंत यथास्थित असे विशेष. बस्मी साजाकडे दुपटा व तिवट व झगा तयार करावयास सनगे दिल्ही आहेत, त्यास तीन महिने जाहले, अद्याप सनगे तयार करून दिल्ही नाहीं. त्यास ताकीद करून लौकर सनगे तयार करऊन पाठऊन देणे व गोपाल कारिगार घड्यालाचा याजवळ, खासे घड्याल व मातुश्री बाईकडील वाड्याचे घड्याल नीट करावयास दिल्हे ते अद्याप घड्याले तयार होत नाहींत. त्यास ताकीद करून लौकर तयार करऊन पाठऊन देणे. रोजमरा भारी, काम लौकर होत नाहीं, याजकरितां निमे रोजमरा देत जाणे. खासे विडे राहत असी समली वेताची जिनसखान्यात आहेत त्यापैकी गवताची अगर वेताची मढल्या खेरीज असेल ती पाठऊन देणे म्हणोन आज्ञा. त्यास, बस्मी साजाकडील तीन सनगापैकी झगा तयार जाला आहे. तिवट दुपटा तयार होणे आहे तो जाहला म्हणजे पाठऊ. दोन घड्याले गोपाल कारिगर याजकडे आहेत त्यापैकीं मातुश्री बाईचे घड्याल आठपंधरा दिवसीं तयार करून देतो. खासे घड्याल तयार व्हावयास साहा महिने लागतील म्हणोन त्याणे सांगितले. निमे रोजमरा त्यास द्यावा म्हणोन आज्ञा; त्यास, निमे रोजमरा तो घेत नाहीं. मातुश्री बाईचे घड्याल

तयार करून घरास जावयास आज्ञा मागतो. याप्रों त्याचा मजकूर आहे. समली वेताची जिनसखान्यांत येक होती ती पाठविली आहे. पावलियावर उत्तर पाठवावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Narayanrao writes to the Peshwa, among other things, about two clocks which were under repairs.*

---

*No. 110]* *[1-4-1769.*

पौ छ १६ जिल्हेज लिसा
चैत्र बा। फतेआली सांडणीस्वार वगैरे.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी

विनंती. उपरी, गंजांतील+ घडाल्याचे भिंग फुटले आहे, याजकरिता तुम्हाकडे पाठविले आहे. तर याचे मेजाचे भिंग सिलकेस असल्यास बसविणें. सिलकेस नसले तर नवे मलवणे. न मिले तर माफजतीने घड्याल जवाहीरखान्यात ठेवणे. रा। छ २३ जिल्काद. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Balaji Janardan is asked to fix the glass of the clock, which used to be kept in a case.*

---

*No. 111]* *[15-2-1770*

पौ छ २७ सवाल सबैन.

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे
सेवेसी

विनंती सेवक रामाजी माहादेव चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ १८ माहे सवाल पावेतो स्वामीचे कृपावलोकने करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीचें आज्ञापत्र घड्यालाविसी सादर जाले कीं, दोन घड्याले दर पनाससाठ रुपयाचे किंमतीचे मुंबईहून खरिदी करून आणोन पाठवणे म्हणोनें आज्ञा; त्यावरून कृष्णसेठ सावकार यास मुंबईस पाठऊन

---

+ पेटी.

शोध मनास आणितां पनाससाठ रुपयाचे किमतीची मिळत नाहीत. थोर घड्याळे दोन हातभर उंच व लाहान डबीवजा येक येकूण तीन, त्या तिहींची किमत सारखीच, दर साडेतीनसे रुपये पडतात, आणि तेथील सावकारीची रीत खरिदी होऊन पसंद न पडतां माघारी टाकल्यास घेत नाहींत. किमतीचा अजमास लेहून आला या किमतींची घड्याळे मिळत नाहींत. सदरहू भारी किमतीची तीन घड्याळे आहेत. यातील लहान किंवा थोर कोणेप्रतीचे केवढें असावे त्याची आज्ञा करावी. आज्ञेप्रा खरिदी करून पाठवितों. सेवेसी श्रुत होय, हे विज्ञापना.

¶*Ramaji Madhavrao informs the Peshwa that clocks for Rs. 60 each could not be had in Bombay, but that they would cost Rs. 350 each.*

---

*No. 112*] [*28-12-1774*

पौ छ २५ सवाल सुा
खमस मार्गसीर्ष.
चिठी लिहिणे.

श्री

**राजश्री नारो आपाजी स्वामी गो,**

विनंती. उपरी, येथील घड्याल स्वारीबौ गेले. याजकरिता नवे घड्यालची येथे ठेविले आहेत. त्यापैकी मयाराम घड्यालची पाा आहे. याचे तसलमातीस दागिने

सुमार :
१ तास कोठी पो देणे. कोठीत चांगला नसल्यास तोफखान्याकडून करून देवणे. पांच शेर वजन.
१ वाळुकायंत्र जिनसखान्यापौ चांगले.
—
२

यो दागिने दोन पाठऊन देणे. जाणिजे. छ २४ सवाल सुा खमस सबैन मया व अलफ. हे विनंती.

¶*Naro Appaji is asked to send one sand-glass for measuring time and one gong for striking the hours.*

*No. 113*] *[20-11-1789*

पौ छ ४ रौवल

तिसैन बाा डाक.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी विनंती. उपरी, तुम्ही पत्र पाठविले ते पावले. हातघड्यालास नवे भिंग बसऊन रवाना केले ते शावूद येऊन पोहचले. राा छ २ रौवल सुाा तिसैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*A hand-watch, having been fitted with a new glass, is acknowledged in this letter.*

---

*No. 114*]

**6. Gopikabai of Gangapur.**

पो छ २४ रमजान.

श्री

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. गंगापुरी जिनस पाहिजे त्याची आलाहिदा यादी पाठविली आहे त्याप्रमाणे पाठऊन द्यावा. येथे तेलंग ब्राम्हण पाणके आहेत ते अद्यापि चांगले बरे जाहाले नाहीत. याजकरितां दुसरे तीन पाणके ब्राम्हण पाठवावे व धोंडू भाव्या खाशे चाकरीचा होता तो मृत्य पावला. त्यास, दुसरा ब्राम्हण पाहिजे. याजकरितां विठोबा सोवनी पुण्यांत आहे तो खाशाचे चाकरीत उगवला आहे. तो ज्या कामावरी आहे तेथें दुसरा ठेऊन त्यास येथे पाठऊन द्यावा. तो येईल त्याणेंच लवंगाचा व दालचिनीचा अर्क आणावा. शुद्राजवळ देऊ नये. दोन्ही अर्क येकक शेर ब्राम्हणाकडून काढऊन ब्राम्हणाबराबरी पाठऊन द्यावे म्हणून आज्ञा जाली आहे. विदित होवें. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore writes from Gangapur asking the appointment of some servants on the establishment of Gopikabai.*

---

*No. 115*] *[10-5-1762*

पैाा छ २९ सवाल

श्री

शेवेसी रामचंद्र नारायेण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ १९ सवालपावेतो यथास्थित असे विशेष. वेदशास्त्रसंपन्न राजश्री

बापूभट जांबेकर पुराणिक सावंताचे वाडीस आहेत त्यांस घोडें माणूस व येक कामाठी ऐसे पाठऊन पुण्यास घेऊन यावें म्हणून आज्ञा जाली. पुराणिकबावांस येक पत्र येथून पाठविलें आहे, हें त्यांस प्रविष्ट करावें व आपणहि येक पत्र लिहून पाठवावें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांची शरीरप्रकृति कशी आहे? मौन धरिले आहे म्हणून वर्तमान आइकिलें; त्यावरून आपणास लिहून पाठवायाची आज्ञा जाली. त्यास स्नानसंध्या काय किती करितात तें सविस्तर लिहून पाठवावें. बहुत काय लिहिणें कृपालोभ असों दीजे हे विनंती.

*¶Ramchandra Narayan Gore, on behalf of Gopikabai, makes inquiries about Dadasaheb's health and occupation.*

---

*No. 116]* *[Recd. 23-1-1764*

पौ छ १९ रजबु

आर्बा पौष.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, तीर्थरूप मातुश्री बाईचे मानस गंगातीर कृष्णातीरी जावयाचे आहे. त्यास न जाण्याविसी विनंती केली. त्यास आज्ञा जाली जे, फरासखान्याचे सामान घोड्याचे सामान तयार करवावे. ऐसियास, खर्चास यैवज पाहिजे. जाणे जाले तर उंट नाहीत, राऊत नाही. हशमी माणूस पाहिजे म्हणौन लिा तें कळलें. त्यास, सामान सांगितल्याप्रों करावें. राऊत येथून सेलारांचे साठ नेमिले आहेत. आणखीहि पंनास राऊत नेमून पाठऊ. सेलारांस येथून पत्र पाा आहे. तुम्ही तेथून पत्र पाठऊन घेऊन जाणें. हशमी माणसांविसी विसाजी केशव यास सांगितले आहे. त्याणी कबूल केलें, जे समई पाहिजेत ते समई शंभर माणूस देतों. खर्चवेचाचा प्रकार तर कार्याकारण लागेल ते देणे. न जावे याविसी आम्ही लिहिणे ते लिहून पाठवितों. बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶The Peshwa writes to Nana Fadnis asking arrangements being made for Gopikabai's intended journey to the banks of the Ganga and the Krishna.*

No. 117] [25-2-1

पा छ २९ शावान.

श्री

श्रीमंत राजश्री दादा साहेब स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक गोविंद सिवराम साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ सावान स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे, विशेष. जासुदाव बर छ १९ साबानचे आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा की, जलालपुरी दारणासांगवी येथे घरे तयार करविली आहेत, तरी मातुश्री बाईस घेऊन ये म्हणून. त्यास स्वामींनी उंटे, राहुटिया साहित्य पाठविले त्याजवरून मातु बहुत संतोश जाली. काली सुक्रवारी मुहूर्ते निघोन संगमावर राहिली आहे राहावयासी दारणासांगवी आगर जलालपूर येथे स्वामीचे विचारे होईल ते राहातील. आपले राहाणे गोवर्धनी जाले तरीहि जलालपुरी राहातील दारणासांगवीस संगमीं आपले राहाणे जाले तरी मातुश्री गावात, गोविंद कृष्ण याच्या वाडियात राहातील. आता दरमजल येऊन पोहचतात. स्वा गंगातीरी राहातात, समीप आपण राहावे हे श्रीमंत मातुश्री बाईचे मनात फार होते हे ईश्वरे सेवटास नेले म्हणून स्वामीवर मातुश्री अति संतोष आहेत. सेवेसं श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Govind Shivram to Raghunathrao, informing him that, as desired by him, Gopikabai had started from Poona for Jalalpur near Nasik.*

---

No. 118] [5-3-1764

श्री

सेवेसी लक्ष्मण आपाजी नातू चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता फाल्गुन शुध्द त्रितीया इंदुवासर मुा मौजे नांदूर यथास्थित असे विशेष. श्रीमंत मातुश्री बाई पुणियाहून निघोन दरकूच मुा मजकुरी आजच दाखल जाली. उदईक शिनरचा मुकाम होईल. पर्वाचे दिवसी दारणासंगमी जातील. मातुश्रीनी (फाटले) त अगर दारणासंगमी गोविंद कृष्ण याचे वाडियांत या दो स्थळांतून येके स्थली राहावे ऐसे स्वामीनी सांगितले होते, ते समई स्वाम त्र्यंबकी होते. प्रस्तुत चावंडसेस स्वारी दाखल जाहाली. याजकरितां मातुश्रीनी कोणे ठिकाणी राहावयास यावे हे आज्ञा सेवकास जाहाली पाहिजे. स्वामीचे मर्जीसिवाय मातुश्रीचा दुसरा विचार किमपि नाही. स्वाम जे स्थळ योजून सांगतील तेथच राहावे ऐसे मानस आहे. परंतु राहावयाचे

स्थळापासून गंगा केवळ निकट अशिली पाहिजे. गंगेहून सोवळ्यानीच घरास यावे, लोकांची दाटी नसावी, इतकी सोय जरूर पाहिजे. जला(ल)पुरी राहावे हेच उभयपक्षी विचारास येईल. ते जागा फार सोयची आहे येविसी विनंती केलीच आहे. स्वामीचे उतर येईल त्याप्रो वर्तणूक होईल. स्वाम जे स्थळ योजून सांगतील त्यासिवाय दुसरे स्थली राहात नाही. याजकरिता स्थल योजून सेवकास पत्री आज्ञा जाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Laxman Appaji Natu consults Raghunathrao as to where Gopikabai should stay, whether at Jalalpur or at the confluence of the rivers Godavari and Darna.*

---

*No. 119]* *[24-10-1764*

पौो छ २८ राखर

सन खमस.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे विनंती. श्रीमंत राजश्री दादासाहेब या प्रांतांतून गेले. आतां इकडे कोणी नाही. आम्ही राहिलों आहो; त्यास, आसपास कोली दंगा करूं लागले. याजकारितां पाऊणशें स्वार राऊत व दुसरें शंभर पाईचें माणूस मावले लोक ऐसे त्याच्या खर्चावेचाची बेगमी करून आम्हाजवल पाठवावे, ऐसी आज्ञा जाली. दुसरें कापड पाहिजे त्याची याद पूर्वी पाठविली आहेच त्याप्रमाणें खरेदी करून पाठऊन द्यावें. त्यास उंटे आपणाजवल असलीं तरी उतमच जाले. नाही तरी आम्हास लिहून पाठवावें; आम्ही पाठऊन देऊं. दुसरें, मातुश्रीस दर महिन्यास तीन दुपटे सोंवल्यात पांघरायासी लागतात. साधे, जरी नाही ऐसे (अपूर्ण).

*¶Ramchandra Narayan Gore, on behalf of Gopikabai, asks for a company of guards for the protection of the establishment at Gangapur. He also reports some other articles required by the lady.*

---

*No. 120]* *[23-3-1765*

पौो छ ९ सवाल

चैत्र मास.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। चैत्र शुध द्वितीया पावेतों यथास्थित असे विशेष. आपण पत्र पाठविले

तें पावलें. वर्तमान श्रीमंत मातुश्रीस निवेदन केलें. त्यास आपण लिहिलें उंटे पाठऊन द्यावी म्हणून. त्यास तीर्थरूप राजश्री कृष्णाजीपंत गोरे याजबराबरी उंटे १० पाठविलीं आहेत व पेशजी दोन; येकूण बारा उंटे पुण्यास आम्हाकडून गेलीं आहेत. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेबांस येथें पाठवाल त्यांचे समागमे सौभाग्यवती मातुश्री रमाबाईसहि पाठवावें. त्यांचा नवस देवीचे दर्शनाचा आहे तोहि करितील. आणि श्रीमंत मातुश्री सगुणाबाईसाहेबांसहि पाठवावें. दोन महिने गंगेचीं स्नानें करून जातील, ऐसी आज्ञा जाली आहे. वरकड कितेक मजकूर तीर्थरूपांबराबरी श्रीमंत मातुश्रीनी सांगितले आहेत त्यावरून सविस्तर आपले ध्यानास येईल. वरकड श्रीमंत आदीकरून पुण्याहून आम्हाकडे रवानगी कराल ते समई शागीर्दपेशा वगैरे खर्च समागमें बहुतच येईल. त्यांच्या रोजमुरेयाची वगैर तरतूद करून द्यावी. आपणाजवल ऐवज नाही हे आम्हास ठाऊक आहे व नवा वाडा बांधावयास प्रारंभ केला आहे हेहि काम भारी आहे. अद्यापि अर्धे जाले नाही. तेहि असों. आम्हाजवल सिबंदी वगैर खर्च समेत कोठी दर माहे रुपये ३००० तीन हजारांचा आहे. थोरले श्रीमंतानी ऐवज दर माहे येक हजार प्रमाणें रुपये आठ हजार देविले ते दोन महिन्यांत खर्चोन गेले. काली आपण दोन हजार ऐवज राजश्री बालाजीपंत मांडवगणे यांजकडून देविला तो तेच दिवसी सेख्याचा ऐवज देणें होता त्यास दिले. आणखी ऐवज किमान पक्ष रुपये १०००० दाहा हजार हर काही करून पाठविले पाहिजेत. आता दर माहे रुपये सात आठ हजार लागतील यांस संदेह नाही. श्रीमंतांजवल सिबंदी नावाप्रमाणें ठेविलीच पाहिजे. कोठींत काही नाही. त्यास, पेशजी याद पाठविली आहे त्याप्रमाण सरकारची कोठी बैल, येक खेप पाठविली म्हणजे काही निश्चिंती होईल. लवकर पाठवावे. बहुत काय लिहिणे, कृपावृधि असावी, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore asks for more money, to be sent from Poona, for the expenses of Gopikabai's establishment at Gangapur, where Narayanrao, Ramabai and Sagunabai were asked to go for a short sojourn.*

---

*No. 121]* *[11-5-1765*

पाौ छ २७ जिलकाद खमस
वैशाख बाा हरि भागवत.

**श्री.**

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

सेवक हरि जिवाजी साा नमस्कार विनंती. उपरी. येथील वर्तमान ताा छ २० जिलकादपावेतो मुकाम गंगापुरी सुखरूप असों विशेष. आपली आज्ञा घेऊन

पुणियाहून आलों. श्रीमंतांचे आज्ञेप्रो श्रीमंत मातुश्रीबाई यांस विनंती केली. आम्ही आलो नव्हतो त्याचेपूर्वी मातुश्रीबाईस पाचसात दिवस थोडा थोडा ज्वर येत होता. परंतु आम्ही आलियावरी करार केला की, श्रीमंत राजश्री नारायेणराव यांस त्रिंबकची यात्रा जाली नाही ते कर (फाटले) दिवस लागतील. इतकियांत ज्वरहि निघतो. प्रकृतहि बरी होईल. समागमेंच जाऊ. अथवा उंटांचा तोटा आहे तरी श्रीमंत राजश्री नारायणराव यांस व मातुश्री सगुणाबाई व सौ मातुश्री रमाबाई यांस पुढे ला(वा)वे, मागाहून आपण यावें. असा प्रकार केला होता. श्रीमंत राव त्रिंबकेस्वरास जाऊन आले तों मातुश्री बाईस ताप आधिक येऊं लागला. दोनच्यार दिवस फारच आला. आता सांप्रत दोन दिवस उतार आहे. याजकरिता शरीरप्रकृत ठीक होय तों च्यार दिवस राहाणे जालें. वैशाखअखेर येणे होईलसे दिसते. परंतु येथे उंट नाही. कनिस्ट पक्षीं पनास उंटाविना येणे होणार नाही. येथे बावीस उंट होते. त्यास, काली आठ उंट कल्याणास पाठविले आहेत. कांही भांडी वगैरे सामान आणविले आहे. त्यास पंधरा दिवस लागतील. बाकी तेराचौदा उंट राहिले आहेत. केवल गाड्यांवरी आगदीच बोझें कसें चालेल? याजकरितां कांही उंटाची सोई जालियास करून पाठवावी. बोझ्याची सोई जालियास अवघीच समागमे येतील. नाही तर श्रीमंत राव व मातुश्री सगुणाबाई व सौ रमाबाई यांस पुढें पाठवावें, मागाहून (फाटलें) रावसाहेब पुणियास पोहोंचोन उंटे माघारी येऊन मग याणी यावें, तरी दिवसगत लागत्ये. जेस्ठ अखेर येणे होईल. लस्करें तरी जेस्ठ सुधांत येतीलसें दिसतें. सेवेसी वर्तमान कलावे म्हणून लिा आहे. लस्करें पंढरपुराइतकी आहेत तों मातुश्री पुणियास यावी असी मर्जी लस्करची मजला आज्ञापिली होती. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Hari Jivaji writes to Nana Fadnis about making arrangements for the journey of Gopikabai, Narayanrao and others from Gangapur to Poona.*

---

*No. 122*] [पौ *18-5-1765*

पौ छ २७ जिलकाद<br>
खमस वैशाख बाा हरि<br>
भागवत खिजमतगार.

श्री

राजश्रियाविराजित राजश्री बालाजी जनार्दन

स्वामी गोसांवी यांसी

पो नारायणराव बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करीत जाणे विशेष. तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान

कळत नाही. तरी सविस्तर वर्तमान, लस्कर कधी येणार वगैरे लिहून पाठवणे. तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब पुण्यास सत्वरच येणार. वझ्यास उंटे पाठऊन देणे. उंटाखेरीरज खोळंबा असे; तरी सत्वर पाठवणे. वहुत काय लिहिणे, हे विनंती. तीर्थरूप मातुश्री काकूबाईस पत्र पाठविले आले आहे. तर तेथून कागदाची रवानगी काकूबाईकडे करणे, हे विनंती.

¶*Narayanrao to Nana Fadnis, asking him to send some camels to carry the luggage of Gopikabai proceeding to Poona.*

---

*No. 123]* *[22-5-1765*

पौ छ ६ जिल्हेज.

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी**
**जनार्दन स्वामी गोसावी यांसी**

पोष्य माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. इकडील वर्तमान तर आम्ही तुंगभद्रातीरीहून दरकूच रामतीर्थास आलो. इलक्या उपरी सत्वरच पंढरपुराहून सत्वरच पुण्यास येत असो. तीर्थरूप मातुश्री बाई पुण्यास येणार त्यास तेथे वोझ्यास उंटे नाहीत. यास्तव पत्र पावताच तेथे उंटे वगैरे पाठऊन सत्वर पुण्यास येणे होय ते करणे. पत्र पावताच सत्वर सामान रवाना करणे. रा छ १ जिल्हेज. बहुत काये लिहिणे हे विनंती. पुण्यात उंटे लोकाचे घरी असतील अथवा हती असल्यास लवकर पा. हे विनंती.

¶*The whole of this letter is written by the Peshwa himself. It contains the news that the Peshwa, who was on his way home from the Karnatic, would shortly be in Poona via Pandharpur.*

---

*No. 124]* *[22-6-1765*

**श्री**

सेवेसी रामचंद्र नारायेण गोरे सां नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत छ ३ मोहरमपावेतो वर्तमान येथास्तित असे विशेष. श्रीमंत मातुश्री बाईसाहेब व राजश्री नारायेणरावसाहेब यांच्या पालखीची मेणकापडे फाटली आहेत, उपयोगी नाहीत. पावसात स्वारी (फाटलें). तरी चांगली मेणकापडे पालख्याच्या बेताची सुमार २ दोन पाठऊन द्यावी. येथे फार खोळंबा जाहाला आहे. तरी सत्वर पाठवावयासी आज्ञा करावी. विदित होवे हे विनंती

¶*Ramchandra Narayan Gore asks for two pieces of water-proof oil-cloth required for the palanquins of Gopikabai and Narayanrao.*

No. 125] [1-11-1768

पौ छ २९ जाखर तिसा.

श्री

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम ता। छ २० जाखरपावेतों मुकाम गंगापूर यथास्थित असे विशेष. खराडीचे मुकामीहून छ ९ जाखरी स्वारी निघाली ते छ १७ जाखरी मुकाम मजकुरी पावली. समागमें उंटें कामाठी वगैरे ज्याजती आहेत ते येका दो दिवशी पाठऊन देतों. आनंदवल्लीस श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे राहाणे असे, तेणेंकरून आम्हांजवळ सिबंदी थोडी असली तथापि काही वाटत नसे. आतां या प्रांतीं कोणी नाही. राऊत होते त्यांसहि निरोप दिल्हा. याजकरितां येथें सिबंदी अधिक पाहिजे. कदाचित गाडदी यांची येक बेरका त्यांची वाणांसुधा असेल तरी द्यावे वरा राहील व सिबंदीचे लोक व राऊतहि चांगलेच असावे. त्यास श्रीमंतास विनंती करावयाची असली तरी करावी, अगर आपणच अजमास पाहोन जे पाठवायाचे असतील तितके पाठवावे. व रुप्याचा देव्हारा रा। गणेशपंताजवळ जवाहिरखान्यात नीट करावयासी दिला आहे तो व त्याचा चवरंग व च्यार चहूंकडील फल्या आहेत त्या न्याहाल चवकीदाराजवल आहेत त्या ऐसे पाठऊन द्यावें म्हणून आज्ञा जाली आहे. लवंगाचा अर्क च्यार तोलेपावेतों पाठवावा. येथें थोडी आहेत ही येथें ठेवावी किंवा कोठें पागेस पाठवावी? या प्रांती प्रस्तुत बाजरी तेरा पाइली, हरभेरे साहा पाइली याप्रमाणें आहे. आपणास लिहून पाठऊन जापसाल आणावा आणि यजमानास दाखवावा याप्रो। आज्ञा जाली त्यावरून लिहिलें आहे. आपली आज्ञा येईल त्याप्रमाणे विनंती करूं. राऊत पाठवायाचे ते लवकरच पाठवावे. बहुत काय लिहिणे, कृपावृधि असों द्यावी, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore requests that a troop of guards should be sent for protecting the establishment of Gopikabai at Gangapur which had recently lost the neighbourhood of Raghobadada's entourage owing to the latter's removal from Anandvalli.*

---

No. 126] [17-11-1768

पौ छ ११ रजबु तिसा

कार्तिक.

श्री.

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ ६ रजबपावेतो यथास्थित असे विशेष. नारायण गवंड्याकडून

१ सैन्याची तुकडी.

मुरलीधर कृष्णाची मूर्ति करविली आहे. तिला येथील मर्जीप्रमाणें रंग रोगणी कसा द्यावा तें ठाऊक आहे, याजकरितां नारायण गवंड्यास बलाऊन मूर्तीस रंग बहुत उतम देऊन [१] जिले विशिष्ट येई तो प्रकार करवावा, आणि तयार जाली म्हणजे माफजतीने पाठऊन द्यावी म्हणून आज्ञा जाली आहे. दुसरें, गंगापुरी घर बांधायाचें आपण मान्य केलें आहे. त्यास, सातां खणाचें, दोहीकडील दोन वोसऱ्या व माजघर, याप्रमाणें करावें. भास्करपंतास लिहून पाठवावें. ते करितील. गंगातीरी घर बांधिले तरी उतम कारणीच लागेल. आज्ञा जाली त्याप्रमाणे लिहिलें आहे. विदित होवें. बहुत काय लिहिणे, कृपावृधि असां द्यावी, हे विनंती.

*¶Ramchandra Narayan, on behalf of Gopikabai, writes about painting a model of Murlidhar (Shrikrishna) and about the project of building a house at Gangapur for Gopikabai.*

---

*No. 127]* *[Recd. 22-11-1768*

पौ छ ११ रजबु तिसा
कार्तिक

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. रोंठी श्रीवर्धनी सुपारी बहुत चांगली वजन पके ८।॰ दाहा शेर व चिकणी खाशी ८८९ ऐशी पंधरा शेर सांडणीस्वाराबराबरी लवकर येऊन पावे तें करावें. खोळंबा जाला आहे. विदित होवें हे विनंती.

*¶Ramchandra Narayan asks for two varieties of betelnuts which were very urgently needed by Gopikabai.*

---

*No. 128]* *[23-11-1768*

पौ छ २० रजब सन तिसा.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम तागाईत छ १२ रजबपावेतो यथास्थित असे विशेष. सन आर्बांचे सालीं मातुश्रीची स्वारी गंगातीरास आली त्या दिवसापासून आजपावेतों कोठीचें लिहिणें तटले आहे. त्याचें कारण काय म्हणाल तरी पहिल्ये साली स्वारीसमागमें

---

१ जिल्हई.

कारकून गंगाधरपंत आपणाकडील व माणकोपंत व मी ऐसें होतों. वाकनिसाच कोणी नवतें. त्या समई माणकोपंताकडून कोठीचें व वाकनिसाचे तर्फेचे लिहिणे लिहविलें. मग ते आपले घरास गेल्यावर गंगाधरपंतानी दोन महिने फडणिसीचे व कोठीचे व वाकनिशीचे लिहिणे लिहिलें. त्यानंतर हरिपंत फडके आले. त्याणी कोठीचें व वाकनिशीचे लिहिणे लिहूं लागले तें खमस अखेरपावेतों लिहिलें. पुढें स्वारी पुण्यास आली ते समई पांच रुपये दरमाहा करून गरीबसा कारकून चिमणाजी शंकर म्हणून ठेविला. त्याणें च्यारपांच महिने यादबूद राखिली. स्वारी आली ते समई चिमणाजीपंताच्या यादी हरिपंताने ठीक पाहोन समजून घेतल्या. त्यासाली वाकनीस समागमे आले. परंतु शाकभाजी, दक्षणा व किरकोल तेवढे मात्र संभालिलें. कोठीकडील व कारखान्याचे कामकाज (न) संभालिलें. अखेरीस स्वारी पुण्यास गेली. त्यानंतर सन सबांमध्यें रा लक्षुमण-पंत आपटे यानी श्रीमंतांची परवानगी सांगितली. मातुश्रीचे स्वारीचे लिहिणे वाकनीस लिहितील ते लिहू देणे म्हणून मजला सांगितले. ते समई आश्विन माशीं स्वारी आल्यावरी वाकनिसांनी गंगापुरास येऊ तोंपावेतों मार्गीं लिहिलें. येथें आल्यावरहि कोठीपैकी सामान घेऊन मुदपाकखर्च मात्र लिहिला. वरकड जमाखर्च हरिपंतच करीत होते. पुढें अखेरीस स्वारी पुण्यास गेल्यावर मुकामी हरिपंत होते. सन समानात स्वारी आली नाही. सालमजकुरी स्वारी आल्यापासून मागती वाकनीस कोठीपैकी सामान घेऊन मुदपाकखर्च लिहितात. वरकड थटी, पागा वगैरे किरकोल हरिपंतच लिहितो. दोघां कारकुनाचे लिहिणें इमारतीसुधां आहे. आजपावेतों मी व त्याणे संभालिलें आहे. परंतु झडल्या जा (अपूर्ण).

¶*Ramchandra Narayan Gore mentions details of the duties of the various clerks who served on the establishment of Gopikabai, at Gangapur, from 1764 onwards. She is mentioned to have visited Poona in 1765.*

---

*No. 129*] [*Recd. 12-12-1768*

पौ छ २ साबान तिसा मार्गसीर्ष

त्रा लक्षुमण खासबारदार

श्री

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती.

पिस्ते वजन पक्के ८८९. शालेचा बुरणूस सोवळ्यात पांघरावयाचे उपयोगी, मधून दोरा नसावा, एकपटी,

मातुश्री बाईसाहेबाचे पायांचे मेजाचे चर्मी जोडे चांगले मृदु सुमार ४ च्यार सरकारचा चांभार जो करीत

रंग काळा अगर तुसी[+] नसावा. वरकड पांढरा पिवळा अगर दुसरे प्रकारचा तलाश करून सुमार १.

असतो त्याजकडून करवून उंटे येतील त्याजबरोबर पाठवावे कलम १.

सदरहूप्रमाणें उंटे येतील याजबरावरी पाठऊन द्यावे म्हणून आज्ञा जाली आहे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore orders shoes and blankets for the use of Gopikabai.*

---

*No. 130]* *[17-1-1769*

पौ छ १४ रमजान
तिसा सितैन.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम पौष शुध १० पावेतों यथास्थित असे विशेष. पुण्यामध्यें श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांचे रंगमाहालांत न्याहालसिंग चवकीदार आहे, त्याजवल सरकारचे दागिने आहेत. त्यांत पांढरे तांब्याचा आस्तावा आहे, त्याप्रमाणे रुप्याचा नवा तयार करून ब्राह्मणाचे पाय धुतात त्यास पाणी घालावयाशी पाहिजे. त्यास, त्याचे तोटीतून साफ पाणी पडते त्याप्रमाणे रुप्याचा आस्तावा करून पाठऊन द्यावा म्हणून आज्ञा जाली आहे. विदित हावे. बहुत काय लिहिणे, कृपालोभ असों द्यावा, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan orders a silver water-jug from Poona for Gopikabai.*

---

*No. 131]* *[3-2-1769*

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायेण गोरे कृतानेक साष्टांग विनंती. येथील कुशल तागाईत छ २९ रमजानपावेतो मुा गंगापूर सुखरूप असो विशेष. संभाजी बेलोसा खासबारदार याजबरोबर जिनस पाठविला तो पावला. बितपसील:

७२ लवंगा ८८१.
७२ येलदोडे ८८१.
३६ दालचिनी ८८॥.
१८ कस्तुरी.
१९८

दालचिनीचा अर्क वजन पके ८८१.
उदबत्या सुमार २००.
मुरलीधर श्रीकृष्णाची मुहूर्त १.

---

+ पिवळसर तांबडा.

अस्तावा रुप्याचा सुमार १ येकून
वजन तोळे २०३.

सदरहूप्रमाणें सामान पावले. अस्तावा पुण्यांत आहे त्याप्रमाणे तेवढा तितकेंच पाणी राहे आणि तोटीने त्याचप्रमाणे पाणी साफ पडे ऐसा नवा रुप्याचा करऊन पाठऊन द्यावा म्हणून आज्ञा जाली. आपण पाठविला तो उतम आहे. परंतु नखशीमुळें धुतां येत नाही; साफ पाहिजे. याजकरितां पुण्यात साधा आहे त्याप्रमाणे करून पाठवावा. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan, from Gangapur, acknowledges the receipt, among other articles, of a model of Murlidhar (Shrikrishna) and a silver water-jug.*

---

*No. 132*] [*17-2-1769*

पौ छ १२ सवाल
तिसा सितैन.

श्री

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम माघ शुध १२ पावेतो यथास्थित असे विशेप. पुण्यातील कोटावरची वगैरे जवळची कुणबिणीचे घरें होती ती मोडली गेली. त्यास, आतां पुण्यास मातुश्री बाईसाहेबाची स्वारी आल्यावरी कुणबिणीस घरें पाहिजेत. त्यास, दुसरी घरें वाड्याचे समीप ऐशी बांधोन ठेवायास सांगावें. घरें पंधरापावेतों पाहिजेत. याप्रमाणे लिहून पाठवायाची आज्ञा मजला बहुत दिवस जाली होती. मी विसरलो होतों. आता स्मरण जाहालें, त्यास लिहून पाठविलें आहे. आपली आज्ञा येईल त्याप्रमाणें विनंती करीन. विदित होवें. बहुत काय लिहिणे, कृपालोभाची वृधि असावी, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore writes from Gangapur that arrangements should be made for building about fifteen new dwellings for the female servants of Gopikabai at Poona, where she intended to go shortly.*

---

*No. 133*] [*21-4-1769*

पौ छ १९ जिल्हेज.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
रामचंद्रपंत गोरे स्वामीचे सेवेसी,

पो बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल ताा छ १२ जिल्हेज जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेप. तुम्ही पत्र पाठविले

ते पावले. श्रीमंत मातुश्री बाई यांची स्वारी पुण्यास येणार. त्यास, सामानाची याद पाठविली आहे त्याप्रो पाठऊन द्यावे म्हणून लिहिलेत. त्यास, तुमच्या लिहिल्याप्रमाणे सामान गोविंद बलाल कारकून याजबराबर पाठविलें आहे. त्याची याद अलाहिदा आहे त्याप्रो पावेल. त्रिंबकपंत गोडबोले यासहि समागमे मर्जी असली तर आणावे. बहुत काय लिहिणे, लोभ असो दीजे, हे विनंती.

¶*Nana writes to Ramchandrapant Gore about the arrangement made for the journey of Gopikabai from Gangapur to Poona.*

---

*No. 134]* *[4-1-1770*

पो छ ६ रमजान

सबैन.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. खाशे चाकरीच्या बाइकांचे मुलांची लग्नें करायाची, त्यापैकी यंदा दोघां मुलांची लग्नें करायाची आज्ञा जाली आहे. त्यास थोडें बहुतानी दोघांची लग्नें करावी. रा चिंतोपंत सहस्त्रबुध्ये व हरिपंत भाव्ये यां दोघांस तेथें नेमून द्यावे म्हणून आज्ञा जाली आहे. विदित होवें. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore communicates Gopikabai's desire that arrangements should be made for the marriages of two of the sons of her female servants.*

---

*No. 135]* *[3-5-1769*

पो छ २८ जिल्हेज

सन तिसा.

**श्री**

सेवेसी हरि बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ २९ जिल्हेज मुा ढासले पाा दाभाडी वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर, श्रीमंत टोक्यास जाऊन गंगापुरास जाणार होते. त्यास, गंगापुरी जावयाचा विचार राहिला. श्रीमंत मातुश्री बाईसाहेब पुण्यास येतात असें जालें. त्यास, आज औरंगाबादेचे आसपास चहू कोसांवर मुकाम होईल. तेथून टोक्यास जाऊ. येकाधा मुकाम जाहाला तर जाला, नाही तर दरकूच पुण्यास षष्ठीचे मुहूर्तास येत असेत. कालावें. अधिकोतर लिहिजेसे नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Hari Ballal writes from Dhasle that the Peshwa, having cut short the programme of his tour, will directly proceed to Poona to meet his mother who was also at this time going there from Gangapur.*

*No. 136]* *[16-11-1772*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री
नारोपंत नाना स्वामीचे सेवेसी.

पो। पांडुरंग कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २० माहे शाबान मुक्काम गंगापूर यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुम्ही जासूदजोडीबरोबर पत्र पा। ते पावलें. तेथें लिहिलें की. श्रीमंतांची आज्ञा. मार्गशीर्षापासून पांच हजार रुपये दरमाहाच्या दरमाहा गंगापुरास श्रीमंत मातुश्री बाईसाहेबाकडे खर्चास देविलें आहेत. येविशीं विनंती करून सविस्तर उत्तर पाठवावें. त्यास. लिहिल्याप्रो। पत्र वाचून दाखविलें. "अस्तु" म्हणोन उत्तर जालें. त्यास आपण महिन्याच्या महिन्यास पाच हजार रुपये गंगापुरास पा। जावे. त्याजवरी कमी लागल्यास राजश्री रामचंद्रपंत नारळेकर गंगापूरचे कारभारी आपल्यास लिहीत पा। त्याप्रो। रवाना करीत जावें. आम्ही आजच निघोन श्रीमंताकडे लस्करात गेलों. कळावें. विशेष वर्तमान ल्याहावयाजोगतें नाहीं. येथील स्तीत केवळ विद्रोही जाली आहे ते पत्री काय ल्याहावें? अशात क्षुद्रोपद्रव न होत असावे. कदाचित येताना आपल्याकडून आल्यास भेटीहि होईल. कळावें. बहुत काय लिहिणें. लोभ करीत असिलें पाहिजे, हे विनंती.

*¶Pandurang Krishna Godbole writes to Naro Appaji Tulshibagwale, acknowledging the receipt of a letter mentioning the monthly grant, ordered by the Peshwa, of Rs. 5,000 for the expenses of Gopikabai's establishment at Gangapur.*

---

*No. 137]* *[28-6-1761*

छ २४ जिलकाद
इसने सितैन.

श्री

राजश्री रघुनाथ पंडित गोसांवीं यासि,

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रावोजी आंगरे वजारतमाब रामराम विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे विशेष. छ २० जिलकादचे पत्र जासुदासमागमे आले ते छ २४ मिनहूस तळेगावचे मुकामी पावलें. श्रीमंत नानासाहेबी कैलासवास केला, ईश्वरें

फार अनुचित केले. किलेकोटाची खबरदारी सावधतेने करावी म्हणून लिहिलें. श्रीमंतांचे कैलासवासाचे वर्तमान घाटमाथापुढे आलियावर श्रवण होऊन चितास परमखेद जाला तो कोठपर्यंत ल्याहावा? ईश्वरगतीस उपाये नाहीं. तथाप श्रीमंत सर्वांचे छत्र, आमचा महदाश्रये; यामुलें चिताचे श्रमाचे आवरण होत नाहीं. त्यांचे जागा आमचे प्रतिपालाचे व श्रमपरिहाराचे ओझे आपलेठाई आहे. जंजिरे माहास्थलाची खबरदारी बंदोबस्त आहे त्यापेक्षा दशगुण विशेष असिलाच पाहिजे. आम्ही तलेगावी आलो. आज चिंचवडास मुकाम होईल. उदैक सेवेसी येऊन दर्शन घ्यावें. पुढे आज्ञा होईल त्याप्रो वर्तणूक करून. रा छ २४ जिलकाद. बहुत काये लिहिणे, कृपा वर्धमान असावी, हे विनंती

¶*A letter of condolence, written by Raghoji Angria to Raghunathrao, offering condolence upon the death of the Peshwa Balaji Bajirao.*

---

*No. 138*] [*29-6-1761*

पौ छ ३ जिल्हेज

आशाढ इसने

**श्रीशंभुप्रसन्न.**

**पुण्यसोल गोपिकाबाई यांसी,**

श्रीमन्माहाराज मातुश्री जिजाबाईसाहेब याणी आज्ञा केली यैसीजे. राजश्री बालाजी पंडित प्रधान जेष्ट बहुल शष्टी भोमवारी निधन पावले म्हणौन निवेदन जाहालें. अशास, ईस्वरे हे गोष्टी बहुत आनुचितच केली. तुम्हास व राजश्री रघुनाथ पंडित व माधवराव यांसी दुखाच्या कोटी जाहल्या. राजश्री सदासिव पंडित व विस्वासराव यांचे ठिकाण न लागले ते चिंतेत निमग्न असतां ईस्वरें हा आघात प्राप्त केला. होणारास उपाये आहे असें नाहीं. आसी कठिण भावना जाहली असोन साहेबास कलविले नाहीं हे तुम्हास उचित कीं काये? याउपरी विवेके करून शोकाचे परिमार्जन करावे. जाणिजे. छ २९ माहे जिलकाद. बहुत काये लिहिणे.

वार

¶*Jijabai, Rani of Kolhapur, offers her condolences to Gopikabai on the death of her husband, the Peshwa Balaji Bajirao.*

*No. 139*]

पौा छ २९ मोहरम.

श्री

शेवेशी बालाजी जनार्दन सां नमस्कार विज्ञापना. ता छ ११ मोहरम पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री दादासाहेबांची शरीर-प्रकृत यंदा बरीच होती. पांचसात दिवस जाहाले, पूर्वी रोग जाहाला होता त्याची भावना जाहली आहे; त्यामुले मर्जी ठीक नाही. औषधेंहि ते आपलीच घेत असतात. येक नाटकशाला साता महिन्यांची गरोदर आहे. विदित व्हावे यास्तव लिहिलें आहे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Nana Fadnis communicates the news that Raghunathrao, for the last week or so, is suffering from a certain disease, the same from which he had suffered before. The whole letter is in Nana's hand written probably to Gopikabai.*

---

*No. 140*]

श्रीशंकर.

सेवेसी त्रिंबकराव विस्वनाथ कृतानेक सा। नमस्कार विनंती. स्वामींनी आज्ञा केली होती कीं, आरमणी वैद्यास साहित्य कामाठी वगैरे सर्व करून देऊन लौकर पाठवणे. त्याजवरून त्याची तयारी केली होती. तों इतक्यांत पत्रीं आज्ञा आली कीं, न पाठवणे; त्याजवरून तो राहाविला. हकीमजीस आज्ञेप्रा सांगितलें. ते तयार होऊन आजच स्वार होऊन स्वामीकडे येणार. रेवदंडेकर पाद्री यास आज्ञेप्रा सांगितलें. तो लौकरच मुंबईस जाऊन औषधे घेऊन स्वामीकडे परभारा आनंदवलीस येणार. स्वामीस विदित व्हावे यास्तव लिहिले असे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Trimbak Vishvanath to Raghunathrao regarding the services of an English physician of Revadanda and a Hakim being requisitioned for treatment at Anandwalli.*

---

*No. 141*] [*8-3-1767*

पौ छ २६ सवाल

सवा हा मल्हारी वगैरे

जासूद जथे कृष्णाजी सितोले.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी विनंती. उपरी, आवल्याचा मुरांबा व चवनप्राश याचें प्रयोजन आहे. तर राजश्री बाबा वैद्याचे घरीं शोध

करून तेथें असल्यास पाठऊन देणें. अथवा * * * आवले मोठे आणऊन त्याचें दों प्रकारचा करऊन सत्वर पाठऊन देणे. गोमुत्र्या सिलाजित फार चांगला व सुरवारी हिर्डेपैकीं हिर्डे येक शेर व सिलाजित अदसेर याप्रो पाठऊन देणे. रा छ ७ सवाल सुा सबा सितैन मया व अलफ बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to send certain articles of medicine for his use.*

---

*No. 142*] [*7-5-1767*

पौ छ ११ जिल्हेज सुा
सबा सितैन वैशाख मास

**श्री**

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी विनंती. उपरी, तुम्ही पत्र पाठविले ते पावले. शेरखान सांडणीस्वार दिा पागा हुजूर याजबरोबर परवरे सुमार ३०० तीनशे पाठविलीत ती पावली. परवरे पथ्यास पाहिजेत; याजकरितां च्यार पाच रोजाचे अंतराने येऊन पोचत ऐसीं पाठवीत जाणे. परवराचे वीज येथे लावावयासी पाहिजे. त्यास, कलमे जगत असिल्यास कलमे पाठवणे; नाही तरी परवराचे बीज पाठवणे. कलमे पाठविलीत तरी येथे आल्यावर जगत ऐसी बहुत माफजतीने पाठवणे. कलमे अथवा बीज पाठवाल, त्यास लावते समई खाली काये घालावे, लावावी कसी, हे मनास अणून लेहून पाठवणें. रा छ ८ जिल्हेज सुा सबा सितैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे, हे विनंती.

¶*This is a receipt of 300 parwars, a vegetable which Nana Fadnis had sent. Some more are asked for.*

---

*No. 143*] [*15-11-1771*

पौ छ १२ साबान सुा
इसने सबैन.

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल कार्तिक शुध ९ पावेतों यथास्थित असे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावले. श्रीमंत मातुश्री राधाबाई माई यांशी कार्तिक शुद्ध तृतीयेस मंदवारी देवाज्ञा जाली म्हणून लिहिले ते निवेदन केले. आपणास विदित होये. बहुत काय लिहिणे, कृपा लोभ असों द्यावा, हे विनंती.

¶*Ramchandra Narayan Gore communicates to Gopikabai the news of the death of Radhabai, the second wife of Balaji Bajirao, which took place on 9th November 1771.*

## 7. Illness and death of Madhavrao I.

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक महिपतराव कृष्ण चांदवडकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ १८ माहे गाल्न मुकाम श्रीवाराणसी येथे स्वामींचे कृपेकरून येथास्थित असे विशेष. स्वामींची आज्ञा घेऊन निघालों ते मजल दरमजल क्षेत्र प्रयागास दाखल होऊन श्रीप्रा नंतरच्या द्रव्याचा धर्म थोडाबहुत सूक्ष्म चौकसी पात्र पाहून केला. मकरमासस्नान करून श्रीमजकुरी माघअखेरीस पावलों. वेदमूर्ति राजश्री विश्वनाथ भटजी गाडगीळ व वेदमूर्ति राजश्री चिंतामण दीक्षित चितळे यांची भेट जाली. येथील धर्मांचा विचार बहुत चौकसीनें वारिक वारिक शोध घ्यावास आपण उभयतां भटजींनी विचार-करून स्वामींची आज्ञा जे होतांची आहे तेच रीतीनें चहून येई(ल). क्षेत्र थोर; ब्राह्मण आलेल्यास; क्षुधित मंडली बहुत; त्याजमध्ये पाहून पाहून श्रावण मासा-पासून आरंभ करीत. गंगापुत्र यांणी बहुत उपद्रव आरंभिला आहे. नित्य उठोन धरणीपारणी करू लागले. ब्राह्मण अनिवार द्रव्यस. कोणाचें चालेना. राजश्री चेतसिंग राजे यांणी व राज्याचे दिवाण राजश्री भाईरामपंत यांणी उपराल्या नाना प्रकारच्या केल्या. परंतु मरावयासी तयार जाले. आम्ही गंगापुत्र, कुटुंबवत्सल, तीर्थीचे स्थाईक, आम्हास धर्माचा अंश द्यावा, वेगळ्यासिवाय सोडणार नाही येसे म्हणों लागले; व श्रीमंत मातुश्री गंगाबाई कैलासवासी यांनी आम्हांचा दावा लटका ठराऊ लागले. शपतआण क्रियाप्रमाण न मानीत. मग आम्हांचा प्रकार शफतीवर चुकला. उपाय किमपि न चाले. निरुपाय गोष्ट जाणोन उभयतां भटजी गाडगीळ व चितळे यांचे विद्यमानें थोडासा अंश संकटास्तव देणे प्राप्त जाला. स्वामीस कळावें. यानंतरी कासीराम वैद्य यासी त्यावयासी जोडी सरकारची आली. पत्र वैद्यबावास देऊन बहुत आग्रह केला. कितक गोष्टी नाना प्रकारच्या नाना युक्तीच्या ते निवेत आस्या सांगितल्या. परंतु न ऐकेत. वृध्धापकाळ, संवटसमाप्तीचे दिवस घालवितात आसा विचार आहे. त्यांची पत्रोतरे आली आहेत त्याजवरून सविस्तर आर्थ श्रुत होईल. राजश्री भाईरामपंत बहुत शाहाणे माणूस कारस्थानी, मनसुबेबाज, भले वितपन्न, ब्रोह्मणभक्त, रीतआत-पूर्व, आसे आहेत. स्वामीचे ठिकाणी त्यांचा परम हेत. हात जोडून तत्पर आहेत. वैद्यक्रियेत निपुण आसे समस्ताचे मुखे येकतो. त्याणी येकदोन वेळा आम्हास बोलाऊन नेले व आपण येकदोन वेळा आले. औषध आम्ही

देतों हे श्रीमताचे उपयोगी पडेल, प्रकृतीस मानून आरोग्यतेस पावतील निभ्रांत यांत संशय नाही आसे आहे, तुम्ही औशध घेऊन श्रीमंताकडे पाठऊन द्यावे, आनुपान सांगतो व पत्र लेहून देतो त्याप्रो व्यावे म्हणोन सांगितले. परंतु, औशाधाचे काम, देणारा पाचसे कोसावर, ठीक दिसोन येईना. स्वामीची मर्जी विनावैद्य संनिध आसल्याखेरीज, वोखद कसेहि आसो, विस्वासूक कोण्ही कसाहि आसो, परंतु औशध घेणे नाही. हे सेवकास पुर्ते ठाऊक आहे. औशध भारी मोलाचे उगेच पाठऊन द्यावे, तेथे स्वामीजवळ उपयोग न पडे, यास्तव प्रतिउतर याच रीतीने करून तूर्त राहविले आहे. परंतु त्यांचा हेत फारच आहे. आज्ञा होईल तरी औशध समागमे घेऊन येईन. पुढे रवाना करावयाची आज्ञा होईल तरी पुढे पाठऊन देईन. जसी आज्ञा होईल तैसे करीन. पत्राचे उत्तराचे मार्गप्रतीक्षेवर त्यांस सांगून तूर्त राहविले आहे. दुसरे त्यांस आज्ञापत्र यावयाविशी आले तरी तेहि श्रीव्यंकटेशाचे यात्रेनिमित्य येऊन येक वेल दर्श (पुढील वंद गहाळ.)

¶*Mahipatrao Krishna Chandvadkar writes to the Peshwa, Madhavrao Ballal, about the charities to be given away at Benares and solicits orders as to whether he should send the medicine prescribed (for the Peshwa) by Bhairampant, the Diwan of Raja Chetsing, who is reputed to be an expert physician and who possesses a high reputation for character and integrity. Chetsing and his Diwan appear in this letter to entertain a great regard for the Peshwa.*

---

No. 145] [1-9-1772

श्री

शेवेशी साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ २ जमादिलाखर मुक्काम थेऊर स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंताची प्रकृति बरीच आहे. किंचित अमांश जाहाला आहे त्यामुले पोटांत मुरडा कांहीं होत होता, त्यास वोमूर्ति राजश्री रामचंद्र भट्ट वैद्य याणी पाचक काढा आज भोमवारी प्रातःकाली दिल्हा. औषध रामचंद्रभटच देत असतात. आपण कधी येतील हे नित्य पुसतात. त्यास भृगुवारी येतील म्हणोन विनंती करितों. शेवेशी श्रुत होय हे विज्ञपाना.

¶*This paper describes the state of health of Madhavrao.*

No. 146] [13-6-1794

श्री

राजश्रीया विराजित रामान्य राजश्री
नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य येशवंतराव त्रिंबक साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता। छ १४ जिलकादपावेतों वर्तमान येथास्थित आसे विशेष. आपणांकडून पत्र येऊन परामृश होत नाहीं तर येसें नसावें. सदैव पत्र पाठऊन सांभाल करीत असावा. आम्हांकडील वर्तमान तर श्रीमंताची प्रकृत दिवसेंदिवस क्षीण आहे. पत्रीं काय ल्याहावें? जो दिवस जाईल तो आपला. कोणे वेलेस घर बुडेल हा भरवसा नाहीं. नाना, ईश्वरें मोठें आरिष्ट आणलें आहे. मी नित्य वाड्यांत असतों. जेवावयास मात्र येतों. सारा वेल तेथें असतों च्यार घटका जवळ नसलें तर म्हणतात कीं, आतां मला सोडूं नको, सेवटीची भेट आहे. आजपावेतों सोबत दिल्ही, आतां कां सोडून जातोस ? सारा वेळ हेंच आहे. येक येक भाशण करितात तीं पत्री काय लिहूं ! सारांश, आमचा सर्वश्वी आपहार जाला. येक तर उभयतां बंधू गेले. घर बुडालें. दुसरें, यांचे पाय धरले त्याची अवस्था ही. भाऊ वारले त्यास याचें बोलणें कीं, भाऊचें नांव चालवावयाचें, भाऊस पुत्र देऊन भाऊचें संस्थान चालवावयाचें. यास श्रीमंत आन्याबा व बापू देव व सखोपंत ढेरे व सिवरामपंत व सर्वत्र मंडली होती त्याचे देखत आज्ञा जाली. पुढें दिवस ह्या प्रकारें आले आहेत. आम्हांस आश्रा सर्व आपला आहे. आम्ही आपलेस जोडून ठेविले आहे. आपण व राजश्री निलकंठरावजी मिळोन काय करावयाचें तें करावें. श्रीमंतांचें बोलणें आहे त्याप्रमाणें करावें. त्यांत ईश्वर आपल्यास आसीर्वाद देईल आणि उत्तरोत्तर कल्याण करील. नाना, मजवर समय परम कठिण आले आहेत. येक तर घरभंग जाला, येक तर श्रीमंत तात्याचे प्रकृतीनें घालविलें. पुढें काय करावें? असो. सर्वश्वी त्राता तुम्ही आहां. सर्व माहितगारी तुम्हांस आहे. भाऊचा स्नेह विसरूं नये. तात्याचे बोलणेप्रमाणें आपण करावें. ह्यांत उत्तम आहे. आशा प्रकृतीस श्रीमंत रावसाहेब व नाना व सर्वत्र परिवार याजवल श्रीमंत तात्यांनी आसावें हा हेत सर्वत्रांचा. परंतु जे कालीं ज्या ठाईं रुणानुबंध असेल तें घडेल. परंतु नाना, आपण सर्वी सर्वत्रानी येकत्र असावें हें उत्तम आहे. आपणांकडील वर्तमान ल्याहावयास आज्ञा करावी, आम्ही रात्रंदिवस घोरांत आहों. कोणे वेलेस काय होईल कलत नाहीं. आसो देवानें हातचें सोडल्यास मनुषाचा काय इलाज आहे ? बहुत काय लिहिणें, लोभ असावा, हे विनंती.

¶*Yeshvantrao Trimbak, from Sidhatek, writes about the last illness of Haripant Phadke.*

No. 147]

श्री

श्रीमंत राजश्री तात्या स्वामीचे शेवेसी

विनंती. सेवक रामचंद्र कृष्ण भातखंडे मो तले साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ २९ माहे जमादिलोवल पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्तित असे. विज्ञापना ऐसीजे. आपली आज्ञा घेऊन जंजिरेयास सरकारची पत्रे घेऊन खाली येऊ लागलो, तेव्हा श्रीमंत सौभाग्यादिसंपन्न वज्रचुडेमंडित पार्वतीबाई व रमाबाईसाहेब याणी आज्ञा केली की, श्रीमंतांचे शरीरी सावकास नाही. याकरिता तुम्ही आगोधर वतनी देव दिवे श्रीवर्धन व श्री येथे जाऊन शोध मनांस आणून होईल वर्तमान ते लेहून पाठवावे म्हणून आज्ञा. आज्ञेप्रमाणे क्षेत्री जाऊन देवास विनंती प्रसाद लाऊन, प्रसाद जाले त्याची याद अलाहिदा श्रीमंताकडे रवाना केली आहे, त्यावरून आपणास विदित होईल. आपण वतनपत्र केलसी तर्फेचे मी असता सिध्ध केले होते. त्यांवर मुख्य श्रीमंतांची स्वताक्षरे व मुद्रा होणे होती, याजकरिता सेवकास पंधरा रोज सेवकास राहाविले होते. त्यास श्रीमंतांची मर्जी यथास्तित नाहीं म्हणून सेवकास निरोप दिल्हा. मी आलियावर काये झाले न जाले ते सेवकास लेहून पाठवावे. आज्ञा जाली म्हणजे मी निघोन येईल. जंजिरयास जावे. सिदी याकूतखान जंजिरकर यांचा व सरकारचा तह जाला होता. त्यांस, सिदी याकूतखान यांचे नावाचे पत्र सरकारचे होते ते घेऊन आम्हीं जावे. ऐश्यास, आगोधर आज्ञेप्रमाणे क्षेत्रीं जाऊन येऊ तो दिसगत लागली. त्यांमधें आबदुल रहिम खानजादे यांणी सिदी याकूतखांन यास धारबंद[1] करून आपण तख्तनिसीन जाले. ते पत्र यांस न्यावयाचे उपयोगी नव्हे. मजकूर तोच, मरातीब[2] तो नव्हे. व रिक्तपाणी कसे जावे? यास्तव श्रीमंतास विनंती पत्र लिहिले आहे. तर आपण मजविसी विनंती करून त्यास पत्र व बहुमानाची वस्त्रे वतनसंमंधे व मला जावयाची आज्ञा श्रीमंताजवल विनंती करून रवानगी होई ते करावे. आपणा कारणे मोहेयांचे नारल दोन व ओल्या सुपारीची पेंड[3] येक पाठविली आहे. कृपा करून घ्यावी. मी आपली विनंती सर्व प्रकारे केली आहे, त्याचे स्मरण स्वामीस असावे. सर्व प्रकारे मी पदरचा आहें. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶[*As ordered by Parvatibai and Ramabai, Ramchandra Krishna Bhatkhande offers prayers to the family deities of the Peshwas in connection with the illness of Madhavrao Ballal. The letter is addressed to Haripant Phadke.*

---

१ पराभूत. २ पदवी, मायना. ३ घड.

No. 148] [1-9-1772 ?

श्री

आसीर्वाद विनंती. कालची प्रकृति गंगाधरानें सांगितलीच असेल. उत्तम आहे. आजहि प्रकृति उत्तम आहे. प्रात:काली पंचोपचार पूजन देवाचे केले. मर्जी ठीक आहे. औषध राजश्री रामचंद्रभटच देत असतात. पूर्ववत सर्व ठीक आहे. आपणहि द्वादश दिवस जाहाल्यावर येतीलच. विस्तार काय लिहिणार ? तात्या, चिरंजीव कांही चुकला असें आइकिल्यास शासन करावें. तुम्ही आम्हास वडील आहां. आम्ही पढलों - मात्र, परंतु वयोवृध्ध व बुध्धीवृध्ध आपण आहा. हे विज्ञापना.

¶*The improvement in the health of the Peshwa Madhavrao Ballal is communicated in this letter probably to Haripant Phadke.*

---

No. 149]

श्री

आसीर्वाद विनंती. काल दोन प्रहरानंतर पोटांत थोडेसें खुटखुटत होतें. आज प्रकृति ठीकसी नाही. मध्यमांत कनिष्ठ आहे. ग्लानी आहे. पोटांतहि मध्यमच आहे. तुम्हाकडेस चिठी घेऊन गेला होता त्याचा जाब आला नाही, म्हणोन कोण गेला त्याची चौकसी होत होती. इतर प्रकार सर्व पूर्ववत् आहे. कलावे हे विनंती. पत्राची चौकसी विशेष नाही. साहजिक विचारिलें, हे विनंती.

¶*This paper gives news about the illness of the Peshwa, Madhavrao Ballal.*

---

No. 150]

श्री

सेवेसी विज्ञापना. गोडांबीच्या पाकाविसी राजश्री दताजीपंतास पत्र पाठविलें ते त्यांस दिल्हें. त्यास पाकाची वोषधी दिली आहेत. पाक जाला म्हणजे हरि दादाजी डाक चौकीचे खबरदारीस आला होता त्यास ठेविला आहे, त्याजबराबर पाठऊन देतो. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer reports that, as desired, the medicinal preparation will be sent as soon as it is ready.*

No. 151] [Recd. 7-9-1772 ?

पो भाद्रपद
शुध येकादशी

॥ श्रीसांबशिवोजयति ॥

श्रीमत्परमहंस परिव्राजकानंद घनेंद्र-
सरस्वतीयतिवर प्रणीतानि नारायण-
स्मरणानि

श्रीमदुमारमणचरणपरिचरणशरणांत:करणासादितनिखिलपुरुषार्थेषु देवद्विजवर्णाश्रमधर्मपरिपालनापरिगृहीतभगवदंशावतारेषु धर्ममूर्तिषु श्रीमत्सु माधवराव प्रधान पंडितमहाशयेषु सकलाभीष्टदानि संतु विशेष. आपण पत्र पाठविलें तदवलोकनेंकरून आपली शरीरप्रकृति विदित झाली. रोगजन्य दु:खानुभव मात्र अल्पकाळपर्यंत आहे परंतु अपायचिंता सर्वथा नाही. पूर्वीहि हा अर्थ आपल्यास श्रुत केलाच आहे. पुन: प्रतिज्ञापूर्वक शरीरास सर्वथा अपायचिंता नाही हाच अमचा निश्चय आहे. आसेतुहिमाचल राज्य स्वाधीन करून सार्वभौमपद भोगादृष्ट बलवत्तर आहे. तस्मात् शरीर चिंता न करणें. क्षिप्र आरोग्य होईल. प्रजापरिपालन यथास्थित करणें. किमधिकं महाशयेषु.

¶*Rapid recovery is assured to Madhavrao by a holy person Ghanendra Saraswati.*

---

No. 152] [19-3-1769

पो छ १७ जिल्काद
तिसा.

श्री

सेवेसी सदासिव अनंत कृतानेक सा नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १० जिलकाद येथास्थित असे विशेष. राजश्री बलवंतराव वैद्य याणी फाल्गुन शुध्ध पूर्णिमेस यावयाचा करार केला होता. त्यास, मारनिलेचे बाइकोस बरे वाटत नाही; ज्वर फार येतो, यामुळे राहिले. स्वामीनी औषधी तेल त्याजकडून करविले होते ते करितात आहेत. दोनतीनसे मोठा गोवऱ्या मेळऊन दिल्या व औषधे दिल्ही. येका दोन रोजी भटी लाविणार आहेत. बाइकोस काही उतार पडिल्यावर पंचमी करून येतील. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप (ना).

¶*This letter refers to one Balwantrao Vaidya, a native physician, who was preparing some medicinal oil for the Peshwa.*

---

१ सवंध पत्र बालबोधींत आहे. नक्कल मुळाप्रमाणें.

5128

No. 153] [5-1-1771

नक्कल.

श्री.

जवाहिरखानापैकी सुा इहिदे सबैन देणे वैद्यखान्याकडे. सौ आनंदीबाई याजकडे सन सीत सितैनात वोपधाबदल भस्म करावयास मोत्ये पुणियाहून आनंदवलीस पठविली ते सिलकेस वोढत होतीं. त्यास हाली रामचंद्रभट वैद्य यानी मोत्याचे भस्म करून दिल्हे म्हणौन पत्र पाठविले. त्याजवरून खर्च मोत्ये वजन तोले ६ दर तोला रुपये २० प्रमाणे रुपये १२० यो मोत्ये दाणे रसानगी यादी सुमारी

६३५

साहाशे पस्तीस मोत्ये राजश्री दादासाहेब याचे स्वारीपैकी जमेस धरून ख़र्च लिहिणे. छ १८ रमजान.

¶*This paper orders some pearls being burnt to ashes, in order to prepare some medicine for the Peshwa who was ill.*

---

No. 154] [8-7-1771

पौ छ ८ राखर
इसने सबैन आषाढ.

श्री.

चिरंजीव राजश्री नारायणराव यांसी

माधवराव बलाल प्रधान आसीर्वाद. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावे विशेष. अरमाणी वैद्य याजवल तेल करावयास दिल्हे आहे :

१ बालंतशोफा
१ शाहाजिरे
१ अनिसून लस्करांतून आनंदराव जिवाजीकडे पाा होते ते.

—
३

तीन जिनसांचें निरनिराले तेल करविले आहे ते तयार जालें असेल. पाठऊन देणे. धोंडी काला याजवल गंधकाचा अर्क असिला तर पाठवणें. त्याजवल नसल्यास दुसरे जागां असल्यास शोध करून पाठवणे. जंगली पुदिना

आणावयास पुण्यातील कोल्यांस सांगितले होते तोहि पाठवणे. स्वारी समागमे सिकलगर आला नाही तर येक सिकलगर पाठऊन देणे. रा छ २४ रविलावल हे आसीर्वाद.

¶*The Peshwa asks his brother Narayanrao to send, among other things, three kinds of medicinal oils prepared by an Armani (Armenian ?) physician.*

---

*No. 155*] [*13-7-1771*

श्री

राजश्री मोरोपंतदादा गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नो आनंदराव बापूजी दंडवत विनंती. उपरी, येथील कुशल ताा आशाढ सुध्य प्रतिपदा जाणून आपले कृपेकरून मुाा कटोर येथ सुखरूप आसो. यानंतर आम्हाकडील वर्तमान तर आपली आज्ञा घेऊन निघोलो ते मुकाम मजकुरास सुखरूप पावलो. दरबारचें वर्तमान तर आणखी येक महिना मुकाम येथच होणार. श्रावण मासांत पुणियास स्वारी जावी ऐसे आहे. श्रीमंताची शरीरप्रकृति थेऊरचे मुकामाप्रमाण आहे. तुलेचे साहित्य केले आहे. तुला करणार आहेत. आपणास कलावे यास्तव लिा असे. बहुत काये लिहिणे, लोभ निरंतर करावा, हे विनंती.

सेवेसी सदासिव मल्हार साां नमस्कार विनंती. उपरी, दरबारचे वर्तमान राजश्री आनंदराव बापूजी लिा आहे त्याजवरून विदित होईल. तीर्थरूप उभयेता आपणापासी आहेत. त्यास, त्यांचा सांभाल कर्णार आपण आहांत. सर्वथें आधार आपले पायासिवाये दुसरा कोणाचा नाही. बहुत काय लिहिणे, लोभ निरंतर करावा, हे विनंती.

¶*Anandrao Bapuji writes to Moropant Dada Fadnis, from Katore, about the health of the Peshwa who had gone to that place for a change.*

---

*No. 156*] [*10-10-1772*

श्री.

अखंडितलक्ष्मआिलंकृत राजमान्य राजश्री माधवराव सदासिव गाो यांसी सेवक माधवराव बलाळाल प्रधान नमस्कार. सुाा सलास सबैन मया व अलफ. तुम्ही तिगस्ता सन इहिदेत विनंतीपत्र पाठविले त्यातील मजकूर की, दागतर इष्टुरी व बाजवेल हे दोघे वैद्य बहुत प्रमाणिक. त्यांची स्तुति जनवार्तेकडून व नबावाच्या मुखे फार ऐकतों. त्यात इष्टुरी बहुत गुणी चांगला माणूस. त्यास श्रीमंतापर्यंत

पाठवाल की काये म्हणोन नवाबास पुसिले. त्याणी उतर केले की, श्रीमंतांची मर्जी असिली तरी अगत्य पाठऊ, म्हणोन लिहिले ते कळले. ऐशास, वैद्य आणण्याविसी दोनतीन पत्रें तुम्हांस गेली, परंतु येकहि पत्राचा जाबसाल आला नाही. त्यास, वैद्याचा आणावयाचा मजकूर तरी त्यास चाकर ठेऊन आणावें. त्यास रोजमरा दरमाहा शंभर दोनसे निदानी तीनसेपर्यंत करून कबूल होत असल्यास आणावें. नवाब बहुमानार्थ पाठवीत असले तरी आणावयाचे प्रयोजन नाही. वैद्य चाकर राहून येत असला तरी नवाबाची परवानगी पाहिजे; यास्तव पत्र पाठविले आहे ते देणें. चाकर होऊन येत नसल्यास पत्र न देणें. लिहिल्याप्रों चाकर राहून येत असल्यास पत्रदर्शनी त्यास घेऊन तुम्ही जलदीने येणें. जाणिजे. छ १२ रजेब आज्ञा प्रमाण.

*¶The Peshwa asks Madhavrao Sadashiv to send immediately an English Physician, who was serving under the Nizam, if a monthly remuneration of Rs. 300, at the most, was acceptable to him and if he would come into service.*

---

*No. 157]* *[12-5-1772?*

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री रावसाहेब

यांप्रति

आश्रित गंगा विष्णु वैद्य कृतानेक आसीर्वाद विनंती. येथील क्षेम ता। वैशाख शुध १० दशमीपरियेंत माहाराजाचे पुन्यप्रतापेकरून मु॥ सवाई जयेनगर येथास्थित असे. यानंतर माहाराजानी कृपाळु होऊन आज्ञापत्रे दोन सादर केली, ते प्रविस्ट होऊन बहुत आनंद जाला. पत्री आज्ञा सादर जाली की, हुजूर येणे. त्यासी हुजूर यावयासी कोन्हे गोस्टीने अंतर नाही. तीन महिन्याचा करार करून आलो होतो, अंतर तरी बहुत पडले, त्यासी आमचा उपाये काय? येथे दाखल जालियावरी काहीच तरतूद बनोन न आला. माहाराजानी राज्यास खलितापत्रे दिल्ही होती, ते राज्यास प्रविस्ट केली. परंतु स्थलाचीहि तरतूद न जाली. मुलेलेकरे कोठे कोन्हाचे आसरियावरी ठेवावी? बहुत श्रमात परिवारात येऊन पडलो. याजकरिता इतके दिवस लागले. सरदाराकडीलहि काही गौरसी दिसोन न आली. माहाराजानी कृपाळु होऊन जलद बोलाविले. त्यासी कळल तैसी तरतूद करून आज्ञेप्रमाणे शेवेसी यावयाचे विचारात आहे. आज्ञेप्रमाणे येऊन पोचतो. मुलालेकरांची स्वस्तता करितो. माहाराजानी याची स्वस्तता होये ते करणार समर्थ आहेत. विस्तारे काये ल्याहावे? आम्ही यावयासी ढील करीत

No. 160]

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री विठलपंत ठोसर यांसी प्रति हरि जिवाजी बर्वे आसीर्वाद. उपरी, ताा माघ शुाा ८ पावेतो सुखरूप असो विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान कले. श्रीमंत कैलासवासी नाना स्वामी यांच्या अस्ती श्रीयात्रेस पाठविल्या. यात्राहून गयावर्जन होऊन आले त्याचा खर्चवेच कसकसा जाहाला त्याचे येथे प्रयोजन लागले आहे. तरी तुम्हास माहितागिरी आहे. कसकसे असेल ते लेहून पाठवणे म्हणौन लिहिलेत. त्यास, आम्हास तोंडजबानी सई नाही. बहुत दिवस जाहाले. हिसेबकितेब दप्तरीं समजोन कैलासवासी माधवरावसाहिब यांणी घेतले आहेत. आम्हाकडे हिसेबा-कितेबाचा गुंता नाही. यात्रेस पाठवावयाची मात्र खटपट केली. नारो केशव बर्वे बहुतां दिवसांचे सिलकी चाकर यांस पाठविले होते. ते हाली नगरास रा लक्ष्मणपंत बर्वे यांजवल आहेत. त्यांस बोलाऊ पाठऊन आणिले म्हणजे ते सर्व सांगतील, किंवा लेहून पाठविणे म्हणजे लेहून पाठवितील. बहुता दिवसांची गोष्ट. आम्हास काही तोंडाने स्मरण नाही. दप्तरी सापडत नाही म्हणौन लिहिलेत त्यास काये म्हणावे ? बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

¶[*Hari Jiwaji Barve informs, in reply to a query about the expenses of the funeral rites of Peshwa Nanasaheb, that he, after so many years, is unable to state anything definitely from memory.*

---

### 8. Raghunathrao and Madhavrao II.

No. 161] [28-3-1781

पौ छ २ राखर
इहिदें आवसीची
च्यार घटका रात्र.

श्री

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनती विशेष. श्रीमंतांची प्रकृत चांगली आहे. देवींच्या खपल्या हातां-वरील व पायांवरच्या पडोन बाकी पंचवीसतीसपर्यंत राहिल्या आहेत; त्याहि पडतील. सौ दुर्गाबाई यांचे निसबतीस सरकारचा खिजमतगार खंडोजी गावडा आहे त्यास त्याणी येथे श्रीमंतांचे समाचाराकरितां पाठविला होता. त्याजबरोबर येक पातल चांगले त्यास व चोली पाठवावयाकरितां उभयेता बाईची आज्ञा जाली. त्यास आम्ही उतर केले की, पातलाचा जिनस येथे नाही. तेव्हां त्यांची आज्ञा

जाली की, तूर्त तीन खण चांगले पाठवावे; मागाहून चोली व पातल अगर दुसरे तऱ्हेचें लुगडें पौ अथवा सेलारी पाठविली पाहिजे; त्याची तर्तूद करून लौकर आणवावी म्हणौन. त्याजवरून तूर्त तीन खण सवाचवीस आंखी पाठविले. पातल व चोली पाठवावयाची असल्यास काय ते उतर पाठवावें त्याप्रो करूं. रा छ २ राखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Nana Fadnis is informed from Purandhar about the health of the young Peshwa who, at the time, was suffering from an attack of small-pox.*

---

*No. 162]* *[25-3-1794*

श्री

सेवेसी त्रिंबक गणेश कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. ता छ २२ शाबान पावेतो मुकाम आनंदवली साहेबाचे कृपेकरून सेवकाचे व मुकाम मजकुरीचे वर्तमान याथास्थित असे विशेष. शरीर भावनेचा मजकूर लिहिला. त्यास आज ज्वर कमी आहे. प्रकृतहि बरीच आहे. काल ज्वर आला नवता. छ मजकुरी प्रहर दिवसपावेतो प्रात:कालपावेतो शरीरभावना बरीच आहे. मागाहून भावना होत जाईल ती लिहीत जाईन. सेवेसी श्रृत होय हे विज्ञप्ति.

¶*The letter refers to the illness of Anandibai at Anandvalli.*

---

*No. 163]* *[1803*

श्री

सेवेसी परशराम खंडेराव राहातेकर चरणी निरंतर मस्तक ठेऊन सां ना विज्ञापना. ता छ सवालपावेतो स्वामीचे चरणप्रतापेकरून मुा चास येथे शेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. काल स्वामीची आज्ञा घेऊन निघालो तो छ मजकुरी प्रात:काली चासकराच्या वाड्यात येऊन मातुश्री मथुरावाईची भेट घेतली. नंतर बाई बहुत संतोष जाहाली. नंतर उतर जाहाले की माझे श्रीमंत बाबासाहेब खुशाल आहेत? तेव्हां शेवकानेहि विनंती केली, माहाराज सुखरूप आहेत. बाई चौकी पाहाऱ्यामुळे आजपरियेंत भोजन केले नवते, निर्षण (निरशन) करीत होते. नंतर आज शेवकाने सांगितले की आपण उपास करू नये, भोजन करावे. तेव्हा बाई बोलली की श्रीमंताची भेट होईल तेव्हा भोजन करीन. नंतर शेवकाने विनंती केली की महाराजानी आपल्यास पुण्यास न्यावयास पो त्यापेक्षा भोजन करावे. नंतर बाईची मर्जी संतोष होऊन दोनप्रहरी भोजन जाहाले. बाईचा पुण्यास यावयाचा मुहूर्त मंदवारी प्रात:कालचा आहे. त्या प्रमाणे बाईस घेऊन सेवेसी येतो. सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञापना

¶*Parsharam Khanderao Rahatekar reports to the Peshwa how happy Mathurabai, some elderly relative of the addressee, felt at the news of his well-being.*

5134

No. 164] [19-1-1791

पौ छ २६ जावल सन

इहिदे तिसैन पौष मास

श्री

सेवेसी गोविंद कृष्ण गोडबोले कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता छ १४ जावल पावेतो क्षेम असे विशेष. श्रीमंत सौ रमाबाईसाहेब यांस सनगे श्रीमंत मातुश्री आनंदीबाईसाहेब याणी पाठविली ती सनगे यो आख

११६ पातल सलईदार १ -

३८। चोलखण २

१८।. २०

१५४। ३८ २

३

तीन सनगे येकसे सवा चौपन आख दुबेर्जी खर्च लिहून महिपती सिंदा खिजमतगार मुा कोपरगाव याजबरोबर पाठविली आहेत. श्रीमंत सौ भागिर्थीबाई साहेब पुणियास पावल्यावर वाड्यात जाऊन देतील. तेथे सदरहू सनगे येकसे सवा चौपंन आखी दुबेर्जी जमा धरावयास आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Govind Krishna Godbole writes about the clothes sent to Poona by Anandibai to be presented to Ramabai.*

---

No. 165] [19-5-1788

पौ छ १० रमजान सुा

* * * *

श्री

सेवेसी आपाजी राम सहस्त्रबुध्ये कृतानेक साा नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता छ १२ साबानपावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यास कामिणीचा उपद्रव जाहला आहे. औषध घेत आहेत व श्रीमंत मातुश्रीबाई साहेब याची मातुश्री व चुलत बहीण ऐसी नासिकीहून येथे भेटावयास आली आहेत. आठ दिवस जाहले. पुढे पधरा विसा दिवसी कोकणात रवानगी होणार. इकडे पर्ज्यन्य लागला. गगेस पूर येऊन गेला. वरकड चौकीचे वर्तमान पूर्ववंतप्रमाणे स्वामीचे आज्ञेप्रमाणे आहे. सेवेसी शृत होय हे विज्ञापना.

¶*Apaji Ram Sahasrabudhe sends news from Kopargaon about Bajirao and Anandibai. Bajirao was suffering from jaundice.*

5135

No. 166] [13-8-1754

छ १९ जिल्हेज.

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री दादा यासी

बालाजी बाजीराऊ प्रधान आसीर्वाद. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष. श्रीवज्रयोगिणी देवीची आज्ञा जाली आहे कीं, देवालये बांधणें; त्यास, येकाच्या द्रव्यानें बांधो नये. सर्वापासून भिक्षा मेलऊन देवालये बांधावे म्हणौन आज्ञा जाली. त्यावरून विचार केला कीं, दर राउती येक रुपया व कारकून मंडलीस येक रुपया व पायाचे लोक हशम किलेकरी व ठाणेकरी व माहालाचे प्यादे व शागीर्दपेशा वगैरे लोक यास दर आसामीस अर्धा रुपया घ्यावा. येणेंप्रमाणें निश्चये केला आहे. त्यास, इकडे राऊत कारकून हशम शागीर्दपेशा माहालकरी यांस आज्ञा केली आहे. कराप्रमाणें यैवज घ्यावयास लागलो आहो. श्रीच्या देवालयास प्रारंभ केला आहे. त्यांस, तुम्हांकडे फौज व शागीर्दपेशा व कारकून माहालकरी आहेत त्यांस सांगोन राउती व कारकुनास येक रुपया व शागीर्दपेशा व हशमी लोक व माहालचे प्यादे वगैरे पाईचे लोक यांस दर आसामीस आर्धा रुपया येणेंप्रमाणें नावनिसीवार झाडा काढूण यैवज जमा करणें. त्या प्रांतातील लाहान मोठे मामलेदार आहेत त्यांजकडील सिबंदी मनास आणून सदरहूप्रमाणें यैवज वसूल करणें. राऊत शागीर्दपेशा वगैरे लोक यांचा रोजमरा देऊ लागावा तेव्हा आसामीपासून नेमणूक प्रो रुपये घ्यावे. बदल मुशाहिरा खर्च घालून घेऊ नयेत. याप्रों करून यैवज जमा करून निराला झाडा राखोन ठेवावा. राजश्री मल्हारबा व राजश्री जयापा व पवार वगैरे मातबर व लाहान मोठे सरंजामी लोक यास याच प्रकारें सांगोन त्याजकडील फौज व लोक मनास आणून सदरहूप्रमाणें यैवज वसूल करून घ्यावा. येकंदर यैवज लिहिल्याप्रों झाडा काढून यैवज जमा करून निराल्या हुंड्या करून यैवज पाठऊन द्यावा. हें कार्य स्मरणपूर्वक आधी करावें. देवाचे कार्य जरूर करावें लागतें, याजकरितां लिहिलें असे. रा छ २३ सवाल सुा खंमस खंमसैन मयां व अलफ. हे आसीर्वाद.

¶*The Peshwa writes to Raghunathrao to collect contributions for building a temple of Vajrayogini. The Goddess, the Peshwa adds, has expressed her desire, through a medium, that the expense for this work should not be borne by one but should be met by small contributions from many.*

5136

No. 167] [23-12-1766 ?

श्री.

चिरंजीव राजश्री दादा यांप्रति आनूबाई आसीर्वाद. उपर, येथील कुशल तागायेत मार्गसीर्स सुध पूर्णिमापावतों वर्तमान येथास्थित आसे विशेष. आपणांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान काहीच कलत नाही, तेणेकरून चित सापेक्षित आहे. वरचेवर येणाराबरोबर पत्र पाठऊन चित संतोसवीत गेले पाहिजे. इकडील वर्तमान हा कालपर्यंत येथास्थित आहे. हाली चिरंजीव राजश्री माधवरांव दक्षण प्रांते कर्नाटक प्रांतात जावयास गेले. बाा आम्हीहि होतों. आज करंजीच्या मुकामीहून निरोप घेऊन घरास जावयास गेलो. कलावे. आपणांकडील आद्यंत वर्तमान लिहिले पाहिजे. आपल्या कल्याणाची मार्गप्रतीक्षा करीत आहों. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

¶*Anubai Ghorpade writes to Raghunathrao that, leaving the Peshwa at Karanji on his way to Karnatak, she was returning home.*

---

No. 168] [30-12-1771

श्री.

सेवेसी नारो अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २२ रमजान मुाा दहीगाव पाा कात्राबाज वर्तमान यथास्तित असे विशेष. छ २२ रमजानी श्रीमंत सौ मातुश्री रमाबाई व गंगाबाई यांची रवानगी हरिहरेस्वरास जाहाली. बाा विसाजी केशव, रामाजी माहादेव यांस दिल्हे. त्याणी फिरोन पुणियास पोहचाऊन मग कोकणात जावे याजप्राा आज्ञा जाहाली आहे. श्रीमंतांचे स्वारीचे कूच होऊन दरमजल सिधटेकास जावे; पुढे पंढरपुरचा रोख दिसतो. उदईक कात्राबाज मांडवगणास जातील. त्रिंबक विनायेक यास आजच निरोप दिल्हा. ते पुणियास येऊन जाणार. बहुत काय लिहिणे, कृपा केली पांहिजे, हे विज्ञापना.

सेवेसी माहादाजी नारायेण कृतानेक साा नमस्कार विज्ञापना. कालच रामाजीपंत नानाची पत्रे आली की, सिवाजी केशव यास तहवरजंगाने विडाजवल लडाई थोडीसी होऊन झांबडाझांबड केली. सिवाजीपंत पलून गेले. याजकरिता राजश्री मुधोजी भोसले यास पुढे रवाना केले. सेनासाहेब सुभेहि अविलंबेच घाट चडोन भेटीस येणार म्हणौन पत्रे आली. श्रीमतांचे मुकाम सिधटेकावर फारसे होणार नाही. पंढरपुराच्या सुमारे जातीलसे दिसते. विदित जाले पाहिजे हे विज्ञापना.

¶*This letter refers to Ramabai and Gangabai having started on a pilgrimage to Harihareshwar, a holy place near Shrivardhan on the west coast.*

5137

No. 169] [23-7-1806 ?

श्री

आसीर्वाद. उपरी, श्रावणमासचे दक्षणेचा समारंभ येथास्थित जाला. येकूण साठ हजार ब्राम्हण जाले. दक्षणा येक लक्ष चव्ऱ्याणव हजार पाचशे साठ रुपये जाहाली. परज्यन्य काल भोमवारापासून लागत आहे. रा श्रावण श्रुा अष्टमी सौम्यवार. हे आसीर्वाद.

¶*This letter mentions that in the month of Shravana, Rs. 1,94,560 were distributed as dakshana to 60,000 Brahmins.*

---

No. 170] [24-4-1767 ?

पौ छ ६ जिल्हेज बाा

बायाजी गणजीकडील जासूद.

श्री.

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसांवी यांसी विनंती. उपरी, तुम्ही पत्र पाा ते पावले. शत्रुपराज्ययार्थ सप्तशती व मन्युसूक्त दोन अनुष्टानास प्रारंभ करून चालती केली म्हणौन लिहिले ते कलले. येक मंडल जाल्यावर समाप्त करावें अथवा संकल्प केला असेल तसे समाप्त करावें. रा छ २४ जिलकाद हे विनंती.

¶*The Peshwa writing to Nana Fadnis refers to certain religious ceremonies which were being performed with the object that they would help to bring about their enemy's defeat.*

---

No. 171]

श्री.

राजश्री बावाजी सिवदेऊ यांणी श्रीरामेश्वरास कासीच्या कावडी ११ अकरा समागमे रामचंद्रभट यास देऊन पाठविल्या आहेत. त्यास मार्गी मुजाहीम[१] कोणी न होणे म्हणऊन पत्रे:

राजश्री मुरारजी घोरपडे यांस पत्र जे, कोणी उपद्रव करील त्यास ताकीद करणे म्हणऊन पत्र. मार्गीचे दस्तक १.

दोन पत्रे द्यावी; परवानगी जाली आहे.

लिहिणे.

¶*The letter refers to state permits being issued to one Ramchandrabhat for carrying unmolested from Benares to Rameshwar pitchers of holy water of the Ganges.*

---

१ हर्कत करणारा.

No. 172]

**श्री.**

विज्ञापना. श्रीमंत तोंड धुऊन आताच गेले. स्नान आता केले नाही. आपणास सांगावे म्हणून मजवल आज्ञा जाहाली की, श्रीमंत नारायणसाहेबाकडून आपण जवल बसून दक्षणा देवावी. त्यास, केव्हा ब्राह्मण आणून बसऊ ते आज्ञा जाहाली पाहिजे. त्याप्रा बंदोबस्त करून ठेवितो. श्रीमंत नारायणरावही स्नान केले नाही. हे विज्ञापना.

¶*This letter reports that the Peshwa, having not taken his bath, has directed that Narayanrao should give away the dakshana to the Brahmins instead of himself.*

---

No. 173] [16-8-1761

**श्री.**

श्रीमंत माहाराज मातुश्री आईसाहेब यांणी राजमान्य राजश्री माधवराव पंडित प्रधान यांसी अज्ञा केली ऐसीजे. हुजरून तुम्हाकारणे श्रावणी पूर्णमेचे पोते सुवर्णाचे येक व रेशमी राखी येक हैबती कदम हुजऱ्या व निंबाजी पांचुगडा व संताजी चवाण जामदार याबराबर देऊन पाठविले आहे. त्याची याद अलाहिदा सादर केली असे. याप्रमाणे घेऊन पावलियाचे विनंतीपत्र लिहून हुजूर पाठवणे. जाणिजे. छ १९ माहे मोहरम सुा इसने सितैन मया अलफ. बहुत लिहिणे तर सूज्ञ आहां.

¶*Tarabai sends to Madhavrao some holy threads of gold and a piece of silk, for being tied round the wrist or arm on the day of full moon of Shravana, the latter as a preservative against evil spirits.*

---

No. 174] [26-3-1763

पौं छ २१ रमजान
सन सलास सितैन.

**श्री.**

वेदशास्त्रसंपन राजश्री व्यंकटरामशास्त्री स्वामीचे
सेवेसी

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, सूर्यग्रहणसमईं शत-गोदानें करणें. दर गोप्रदान रुा चालीसपर्यंत गाये व सरंजामसुधा येकून चार हजार रुपये सरकार यैवज पौ खर्च करणें. समयास गाई शत मिलाल्या नाहीं तरी ज्या मिळतील त्या देऊन बाकी रुा नेमणूक प्रा उतम ब्राह्मण चांगले

पाहोन देणें. ग्रहणसमई कुशोसिती मंत्रेकरून नर्मदास्नाने कुशेकरून करवणे. ग्रहणस्पर्शापासून ग्रहण सुटे तोंपर्यंत येक ब्राह्मण लावणें. जितकी स्नाने होतील तीं करवावीं. त्यास दक्षणा पंनास रा। देणें. मंडलेश्वरची अगर कसरावद प्रा। पयेकी येक चाहूर प्रा। जमीन ग्रहणसमई ब्राह्मणास देणे. दक्षणा शंभर रुपये देणे. उपरागसमई येणेप्रमाणें करून उत्तर केल्याचे पाठवणे. रा। छ १० रमजान चैत्र शुध द्वादसी शनिवार. हे विनंती.

¶*Raghunathrao orders Vyankatram Shastri for certain religious charities to be bestowed on learned Brahmins at the time of the eclipse of the sun.*

---

*No. 175]* *[15-4-1763*

श्री

रा। परशराम बलाल दामला यासी

रघुनाथ बाजीराव सु।। सलास सितैन मया व अलफ. श्रीदेवाचे चरणप्रक्षालित जल पाहिजे, त्यास औदुंबराजवलील श्रीगंगेचे उदक आणून गाळून उतम शोडशोपच्यार पूजा करून त्यांतील तीर्थोदकाने दोन चंबू तांब्याचे भरून पाठऊन देणें. जाणिजे छ १० सवाल. सविस्तर केसो गोविंद याचे पत्री लिहिले आहे त्याप्रो। जल पाठवणें. छ मजकूर वैशाख शुध त्रयोदसी.

सोमवार.

¶*Raghunathrao asks Parsharam Ballal to send him some holy water of the Krishna out of the deity's bath at Audumbar.*

---

*No. 176]* *[25-1-1764*

पौ छ २६ रजब
पौष मास.

श्री

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी
गोसावी यासी

विनंती उपरी. श्रीदेवदेश्वर वास्तव्य पर्वती येथील साहित्याची कलमे

चौकीस नेहमी पेशजीपासून पचवीस हशमी लोक असतात. साल मजकुरी जाजती पंधरा येकूण च्यालीस

श्रीदेवदेवेश्वरास पोशाक व लिंगास व लोडास आभ्रे वगैरे सालाबाद पावतात. त्यास साल मजकुरी पोशाक

माणूस द्यावे म्हणून विनतीं केली. त्यास सालाबादप्रो पचवीस नेमून देणे. जाजती पंधरा माणूस लोकाचा भरणा असिल्याप्रो देणे. कलम
१

सताजी पारवा खास सरदार नेहमी देवाजवळ आहे, त्यास सिवाजी कानो याणी दूर केला आहे, तरी संताजी मजकूर याजपासून काही अतर पडिले नसिले आणि नाइक दूर केला असिला तरी चौकसी करून अतर नसिल्यास करार करून ठेवावा. कलम
१

वडगावचे बागाकडे व बेलाचे झाडाकडे खिजमतगार आसामी दोन नेहमी आहेत. त्यास रोजमरा तुम्ही चाकरीची चौकसी करून शागीर्द-पेशाबरोबर देत जाणे. कलम
१

व लिंगास मेखला जुन्याप्रो नव्या तयार करून देणे. लोडास अभ्रे वगैरे कार्याकारण पाहून करून देणे. कलम
१

जिनसखानापैकी जिनस पुजेस देवास दरमाहाचा दरमाहा पावेत आहे, त्याप्रो हाली नेमणूकप्रो दरमाहाचा दरमाहा देत जाणे. कलम
१

नव्या मूर्ती करावयाच्या सुमार

१ नारायेण
१ सूर्य
१ स्वामी कार्तिक
—
३

४ आर्च्या जुन्याची
१ विष्णु
१ गणपति
१ देवी
१ नंदी
—
४
—
७

येकूण सात देवांची पो नवे तीन तयार करून व जुने च्यार येकूण सात देवांची आर्च्या करून स्थापना पूर्ववतप्रो करणे. कलम
१

येणेप्रो साहा कलमे करार करून देविली असेत. सदरहूप्रो करून देणे. रा छ २१ रजब सुा आर्बा सितैन मया व अलफ. हे विनंती.

¶*Assignments towards the worship of Devadeveshwar at the shrine of Parbati are mentioned in this letter.*

No. 177] [2-2-1764

पौ छ १८ साबान.

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री सदा-
सिव रघुनाथ गोसावी यासी

सेवक माधवराव बलाल प्रधान नमस्कार. सुा आर्बा सितैन मया व अलफ. प्रां पारिंड येथें आश्रित ब्राम्हण आहेत. ज्यांस वर्षासन धर्मादाय व नख्त रुपये व जमीन इनाम व गांव इनाम सेंभर रुपयांवर यैवज ज्याकडे पावेत असेल, त्यांस बोलाऊन आणून सांगावें कीं, खासा स्वारी कर्नाटक प्रांती मसलतीवरी जाहाली आहे. त्यास, शत्रुपराजयार्थ अनुष्टान आपले घरीं स्वकष्टार्जित येजमानकल्याणार्थ करावें म्हणून सांगावें आणि लिहिल्याप्रों उत्तम प्रकारें अनुष्ठान करवणें. जाणिजे. छ २९ रजेब. आज्ञा प्रमाण

¶*[The Peshwa desires that certain Brahmins should perform some religious rites, at their own expense, with a view to invoke divine aid in his encounter against the enemies in the Karnatak.*

---

No. 178] [3-7-1764

पौ छ ३० मोहरम
खमस.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी
जनार्दन स्वामी गौ

पोष्य माधवराऊ बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित जाणें विशेष. वेदमूर्ति राजश्री गंगाधरभट कर्वे उपाध्ये यांचे विद्यमानें अनुष्ठानें करावयाचीं, त्याचे दक्षणेचा अजमास रुपये:

१००० मृत्युंजय जप १००००००
१२०० मन्युसूक्त विधानाप्रमाणें १२००
५०० सहस्त्रचंडी आवर्तनें १०००
२५० गणपतिसहस्त्रनाम आवर्तने थेऊरीं १०००
२५० गणपतिसहस्त्रनाम मोरेश्वरीं आवर्तनें १०००
---
३२००

येकून बतिसशांचा अजमास लिहिला आहे. त्यास. वेदमूर्तीस बोलाऊन आणून लिहिल्याप्रों अनुष्ठान करवणें. दक्षणेचा अजमाज लिहिला आहे; त्यास,

दक्षणा व उपसाहित्य मिलोन चहू हजारांपासून पाच हजारपावेतों खर्च करून यथासांग अनुष्ठान करवणें. रा छ ३ मोहरम सुा खमस सितैन मयां व अल्फ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis to make arrangements for the performance of certain rites, among them being one which is meant to prevent death.*

---

*No. 179*] [*17-12-1764*

पो छ ९ रजबू

खमस पौष

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी

गोसांवी यासी

विनंती. उपरी: तीर्थस्वरूप सौभाग्यवती मातुश्री पार्वतीबाई व मातुश्री सगुणाबाई यांजकडे धर्मादायाचा खर्च मनस्वी होतो म्हणोन कळलें व तुम्हीं येक दोन वेला लिहिलेंच होते; त्यास, ये गोष्टीचा बंदोबस्त करणे. परवानगी सिवाय काहीं न देणे. रा छ २३ जमादिलाखर. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa, having noted that the expenses for charities incurred on behalf of Parvatibai and Sagunabai have gone to an excess, orders Nana Fadnis to be more strict regarding that item of expenditure.*

---

*No. 180*] [*17-12-1764*

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी

जनार्दन स्वामी गोसावी यांस

पोष्य नारायेणराव बलाल नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणौन स्वकीये लिहिणे विशेष. आम्हास काहीं दुष्ट ग्रह आहेत त्यांचा ज्यप करावयास येथे संकल्प करून वेदमूर्ति राजश्री नारायेणभट भाव्ये यांस सुपारी देऊन तुम्हा-कडे पुण्यांस पाठविले आहेत. तरी यांचे स्नानसंध्येची व भोजनाची सोय करून वाड्यांत देणे. आणि येक लक्ष ज्यपाचे संख्येची याद वेदमूर्तीजवळ

दिल्ही आहे त्याप्रमाणे करवणे. समाप्त जाहाल्यानंतरी वेदमूर्ति राजश्री गंगाधर भट कर्वे उपाध्ये यांचे विद्यमाने दक्षणा देणे. भटजीस प्रारंभी साहित्य सुमार:

१ तांब्या
१ आसनांस घोंगडी
१ गोमुखी
१ रुद्राक्षमाला
१ धोत्रजोडा

५

येणे प्रमाणे पांच सुमारी देऊन अनुष्टान येथास्तित करवणे. रा छ २३ जमादिलाखर सुाा खमस सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Narayanrao Ballal writes to Nana Fadnis requesting him to make the necessary arrangements for a certain kind of worship which is to be performed to counteract the evil influence of some stars under which, he (Narayanrao) believes, he has fallen.*

---

*No. 181]* *[11-1-1765*

श्री

राजश्रिया विराजित राजामान्य
राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी
गोसावी यासी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. वो कोनेरभट यास सिधटेकास अनुष्टान करावयाकरिता पाठविले आहेत. तेथे भटजी अनुष्टान करितील त्यास ब्राह्मणाचे स्वयेंपाकास भांडीं शंभर ब्राह्मणांचा श्वयेपाक हाये ऐसीं याचे तसलमातीस लेहून याजकडे पाठऊन देणे व प्यादे अथवा खासवारदार आसामी दाहा अनुष्टान समाप्त होये तो पावेतो देणे. रा छ १८ रजब सुाा खमस सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हें विनंती.

¶*Raghunathrao asks Nana Fadnis to make necessary arrangements in connection with the performance of a certain kind of worship at Sidhatek.*

No. 182]

पौ छ ९ सावान खमस

माघ बा सांडणीस्वार.

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यासी

पोष्य माधवराव बल्लाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष. श्रीहरिहरेश्वर येथे नगारखाना ठेवावा असा नवस आहे याजकरितां तुम्हांस लिहिलें असे. तर नगारखान्याचें साहित्य नौबत नगारे व कर्णे झांज व तुरई याप्रों सरंजाम व नगारची वगैरे पाहिजेत त्याची याद अलाहिदा पाठविली आहे, त्याप्रों सरंजाम करून देणे. पुण्यांत सरंजाम करून द्यावयाचा असेल तो पुण्यांत करून देणे. कोकणांत राजपुरी सुभापैकी देवणे असेल तो तेथे देवणे. माणसे पुण्यांत ठेऊन द्यावी लागतील त्यास नालबंदी रोजमरा द्यावा लागेल तो देऊन रवानगी करणें. पुढें नेहेमी नेमणूक राजश्री नारो त्रिंबक यांजकडे करून देणें. सर्व सरंजाम करून देऊन सुमुहूर्ते-करून नगारखाना देवाजवळ सुरू करणे. रा छ २८ रजब. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa asks Nana Fadnis to make the necessary arrangements for instituting a nagarkhana, i.e. musical band, at the temple of Shree Harihareshwar.*

---

No. 183] [19-4-1767

पो छ २९ जिल्हेज सन सबा

बा जासूद जथे जोत्याजी ना

१ मल्हारजी डुबा

१ माणकोजी ताव्या

—

२

श्री

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजी
जनार्दन स्वामी गोसावी यासी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत जाणें विशेष. आंब्रभोजन ब्राह्मणास येणेप्रो करणें:

५००० पुणे वडगाव वारजे तीन स्थली मिळोन पाच हजार करणे. तीन स्थळांतून सोईस पडेल तेथे करणे.

१००० माहुलीस कृष्णात्रिणीसंगमी येक सहश्र करणें.
१००० भिमातीरी खेड अथवा तुळापुरी येक सहश्र करणें.

७०००

येणे प्रमाणे सात सहस्र ब्राह्मणास आंब्रभोजन सदरहू लिहिल्या स्थली सरासरी दर आसामीस दक्षणासहित येक रुपया याप्रो सात हजार रुपयात सात सहश्र ब्राह्मणास आंब्रभोजन करणें. रा छ १९ जिलकाद सुा सबा सितैन मयां व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Raghunathrao gives instructions to Nana Fadnis for feeding 7,000 Brahmins, the principal dish being mango-juice.*

---

*No. 184*] [*24-8-1767*

पो छ जमादिलौवल
सनसमान

**श्री**

राजमान्य राजश्री केसो बलाल गोगटे कमाविसदार पो त्रिंबक यासी रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा समान सितैन मया व आलफ. कसबें मजकूर येथें भुवनेश्वरी देवीजवळ सुखदेवपुरी गोसावी फार वृद्ध आहे आणि ते स्थळीं बहुत दिवस राहातो, यास्तव पोटाबदल दरमाहा रुपये च्यार रुपये करार करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली असे. तरी गोसावी मजकूर ते स्थलीं राहील तोंपर्यंत सदरहू च्यार रुपये दरमाहाचा दरमाहा देत जाणें. सदरहू ऐवज माहालचे ऐवजीं मजुरा पडेल. जाणिजे.
छ १८ रबिलौवल आज्ञाप्रमाण.

सदरहूं सनद विसाजी हरीचें नावें देणें
सनद लिहिणें.

¶*Raghunath Bajirao orders a stipend of Rs. 4 per month for the maintenance of Sukhadevpuri Gosavi residing at Trimbak.*

---

*No. 185*] [*2-12-1768*

पौ छ १७ साबान सन
तिसा मार्गसीर्ष.

**श्री**

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपर, श्रीक्षेत्र पुलें येथे गणपतीचे अनुष्ठानास चातुर्मास्यांत पांच ब्राम्हण पाठविले होते. ते अनुष्ठानसमाप्ति करून पुण्यास आले आहेत. तर

दर ब्राम्हणास रुपये १२० येकसेवीस, येकून पांचांस साहाशे रुपये दक्षिणा देणे. छ २१ रजब. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa orders Nana Fadnis to pay as dakshina Rs. 120 to each of the five Brahmins who were appointed to perform certain religious rites.*

---

*No. 186*] [*10-12-1768*

पो छ ४ सावान
तिसा बा कृष्णाजी खंडोजी
जथे बावाजी ना.

श्री

राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी

विनंती. उपरी, सिधटेकास अनुष्टान करावयाचे :

संततधारेचे अनुष्टान पंचेतालीस दिवसपर्यंत करावें. सिधिविनायेकास येकवीस सहस्र प्रदक्षणा घालवाव्या.

दोन्ही प्रकार लिहिल्याप्रों चांगले ब्राम्हण पाठऊन करवणें. याखेरीज प्रत्यहीं शंभर ब्राम्हण भोजनास श्रावण मासपर्यंत घालवावयाचे आहेत. त्यास, नासिक, वाई, पुणें या तीही जागांतून येक जागा तुमचें विचार होईल तेथें शंभर ब्राम्हण नित्य भोजनास घालीत जाणें. येक पैसा दक्षणा द्यावी. भोजनास दोनच्यार शाका, कढी, सांवारे, पांढऱ्या पोल्या, साकर, तूप याप्रों घालीत जावे. लिहिल्याप्रों करवणें. रा छ २९ रजब. बहुत काये लिहिणें हे विनंती.

¶*The Peshwa writes to Nana Fadnis about the arrangements for the performance of certain religious ceremonies at Sidhatek and adds that one hundred Brahmins should be daily entertained for dinner till the month of Shravan.*

---

*No. 187*] [ *Recd. 12-5-1770*

पौ छ १९ मोहरम सबैन
वैशाख बा कासंवेग
सांडणीस्वार.

श्री

विज्ञापना. आपण सांडणीस्वाराबा श्रीमंतास धुवट सनगें पोशाकी पा ती पावली. सरकारचे पत्रांचे जाब मागाहून पाठवितों. स्वामीनीं वो रामचंद्र

5147

भट दिवेकर यांजवळ सांगितलें तो मजकूर आपण श्रीमंतांस लिहिला ते पत्रं वाचून पाहिले. त्याप्रोच देशास येत आहेत. वैशाखी आमवास्येस ग्रहण आहे. तुलादान करणार. तुंगभद्रातीरी होईलसें दिसते. हे विज्ञापना.

*¶This letter, written to Nana Fadnis, refers to the Peshwa's intention of weighing himself (with silver or gold) on the bank of the Tungabhadra on his return journey from Karnatak.*

---

*No. 188]* *[21-2-1770?*

पो छ सवाल ह्या सोलापुरचे राऊत

**श्री**

शेवेसी रामचंद्र नारायण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील क्षेम माघ वा। ११ पावेतो यथास्तितत असे विशेष. नित्य ब्राम्हणास कंठ्या देतात, त्यांस पानड्या लावावयासी जवाहिरखान्यांतून खराडीचे मुकामी कंठे दोन आणविले होते, त्यास एका कंठ्यापैकीं पानड्या हिरकण्याच्या सुमार ८९ एकूण वजन तोळे समेत सोनें ७॥२॥। साडेसात तोळे पावणेतीन मासे. या पानड्या आपणाकडे प्रिताजी शेलार याजकडील स्वार आसामी २ दोन याजबराबरी पाठविल्या आहेत, त्यास यांचे हिरे उखळून पानड्या घाट आइते आहेत ते उकाळ्यांत घाळून उजळून, मागती हिरकण्या बसऊन खाली पत्रे चांगले घाळून, नवें कोंदण करून, दहापाच कारीगर बसऊन, लवकर तयार करऊन पाठऊन द्यावा, म्हणून आज्ञा जाली आहे. जवाहीरखान्यापैकीं दोन कंठे माझे तसलमातीस आहेत त्याची शहतवार+ यादी मजजवळ नाहीं, याजकरितां राजश्री गणेशपंत जवाहिरखान्याचे त्यांस सांगोन शहतवार यादी पाठऊन द्यावयाची आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें, कृपा लोभ असो दीजे, हे विनंती.

*¶Ramchandra Narayan Gore writes about the necklaces which Gopikabai intended giving away by way of presents to Brahmins.*

---

*No. 189]* *[29-5-1772*

**श्री**

राजश्रियाविराजित राजमान्ये राजश्री
वाळाजी गोविंद स्वामी गोसावी यासी

पो रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष. श्रीगंगच्या व यमुनेच्या कावडी तुम्ही

---

+ तपशीलवार?

सालाबाद पाठविता त्या गैरहंगामी येऊन पोहचतात. तरी ऐसे न करणे. भाद्रपद मासी निवळ पाणी पाहून कावडी भरवणे. सुमार ५० पनास; येमुनेच्या पंचवीस व गंगेच्या पंचवीस, एकूण पनास. त्यास अजुरा रुपये हजार पडत ऐसे करून कार्तिक मार्गेसीर्ष मासी येथे येऊन पोचत ते करणे. रा छ २९ माहे सफर सुा इसने सबैन मया व अलफ.

¶*Raghunath Bajirao gives instructions to Balaji Govind for sending the holy water of the Ganges and the Jumna by the time the Kartik and Margashirsha months arrive.*

---

*No. 190]* *[18-11-1772*

श्री

यादी विद्यमान सौभाग्यवती रमाबाई सुा सलास
सबैन मया व अलफ.

| | |
|---|---|
| १३०० | कुणबिणी खासे चाकरीच्या आसामी १३ दर १०० प्रमाणें. |
| ५०० | खिजमतगार खासे स्वारीचे ५ आसामी दर १०० प्रमाणें. |
| ९०७५ | वाड्यांतील चाकरीचे ब्राम्हण व आचारी दर ५० दर १०० व खिजमतगार दर १०० दर ५०. |
| ३७२५ | अग्निहोत्री पुण्यांतील आसामी दर १०० प्रमाणें. |
| १४६०० | |

¶*Rupees 14,600 were distributed as charities by Ramabai at the time of her going Sati when her husband died (18th November 1772).*

---

*No. 191]* *[3-6-1773*

राजमंडळ

स्वारी राजश्री पंतप्रधान सुा सलास

जमा साल मजकूर कमाविस तेजकरा[१] बाा प्रांत वसई विसाजी केशव याचे अमलावाा दीड लक्ष रुपये तजक(क)रा करणारानी केला ते जमा रुपये १५००००

---

१ पैशाच्या अफरातफरीमुळें निघालेलें येणें ; चोरी.

जमा परभारे रुपये
१५००००

बाकी ताा अखेर साल रुपये
०

जमा परभारें

छ ११ रौवल अखेर साल. सौवती रमाबाई याणी सहगमनासमई धर्मादाव वगैरे बाा ऐवज देविला त्याच्या यादी आहेत व आलीकडे देणे यादी जाहाल्या त्याची वाटणी रसानगी यादी. प्रां मार विसाजी केशव याचे अमलाबाा दीड लक्ष रुपये तजकरा करणारानी केला, त्यापौ आबाजी यादव याणी येक लक्ष रुपये आपाभट शारंगपाणी याजकडून हवाला दिल्हा ते देविले. रुपये :

६०६५० धर्मादाव

१३००० आश्रित आा ८ यांो.
१०००० धोंड जोसी पंचनदीकर.
१५००० मावशा आाा ३.
५०० कृष्णाबाई.
५०० कासीबाई परांजपी.
२००० लक्षुमीबाई गाडगील.
५०० रामचंद्रभट माईनकर.
१००० आपाभट वैद्य.
५०० रामचंद्रभट लेले कासीकर.
५०० शामभट नांदेडकर.
२०० त्रिंबकभट गोडसे.
५००० रामचंद्रभट वैद्य.
१००० जगनाथभट थेऊरकर.
३४५० समस्त ग्रामस्त अग्निहोत्री आा ३६ यांो
५०० बालकृष्णभट छत्रे
२००० आपाभट खरे
५०० लक्षुमणभट दिवेकर
१५०० सिवरामपंत धर्माधिकारी
३०० जगनाथभट तेलंग मेथनकर
२००० चिंतामणभट देव गणपतीचे.
७०० रघुनाथभट चंद्रात्ये त्रिंबककर घराबदल रुपये १००० पेसजी पावले रुपये ३०० बाकी हाली

६०६५०

२१९५० बक्षीस रुपये :

११९०० कारकून सिलेदार आा ७
३००० शागीर्द आा ५ याो
२५० दिा पागा हुजूर आा २
६०० चौकीदार आा २
२२५० आच्यारी आा ८

[ अपूर्ण ]

¶*This is an incomplete list of charities given away by Ramabai at her Sati.*

---

No. 192] [10-8-1773

माहाल रत्नशाळा झडती.

सुा सलास.

स्वारी राजश्री पंतप्रधान

खर्च खेरीज मुा धर्यादाव किता माहे रोवल छ ११ रोज अखेर कैलासवासी सौ रमाबाई याणी छ २१ सावानी सहगमनसमई आपले निा दागिने वाटिले ते हाली खर्च रसानगी मखलासीची याद. छ २० जोवल सन आर्बा सबैन देणे ब्राम्हणास जडाव दागिने :

२ देणे गोपीनाथ दीक्षित यासी
१ माल मोत्याची वाा खेाा गुाा दामोदरदास पो * *
३७१०

मोत्ये सुमारी १२१.
१ नथ रासकर्दन पौ याो शाा
२ मोत्ये जोडी थोर
१ पाचमणी
३
२

२ देणे बापूभट घारपुरे याचे स्त्रीस पोहच्या माणिकमण्यामोत्याच्या रासकर्दनपैकी निा मो बाई पौ यो शा

९४ मोत्ये किा रुपये ९४०

४८ माणिकमणी.

६ प्रा रु २५०

४२ प्रा बजन तोले १।१।-॥।-

४८

१०२

१ देणे आमाशास्त्री यांस पोहची मोत्याची जोड १ यो मोत्ये १०० पौ बा रासकर्दन पौ मोत्ये ५०

१ देणे कृष्णशास्त्री यासीं पोहची मोत्याची १ मोत्ये १०० पौ रासकर्दन पौ मोत्ये ५०

१ देणे देव चिंचवडकर यासी कंठा मोत्याचा बा नीलकंठ नारायण मजमदार पौ छ १९ रमजान ता राघो कृष्ण कारकून निा पोतनिसी यो शा

२८ सोमासे २ यो

१६ हिरकण्या दर ८

१० चुणी दर ५

२ पाचकिर्डे दर १

२८

२९ पानड्या ९ यो शा

९ हिरे तरतरे दर १ प्रो

८ चुणी

६ प्रा ३ दर २

२ प्रा २ दर १

८

5152

७ पाचकिडे

५ लोलक

२ पाचमणी

३ माणिकमणी

--

५

---

२५

२ ताईत

१ हिरा

१ पाच

---

२

३९९ मोत्ये सरास

३९७ मोजदाद

२ कमी वा। झाडा.

---

३९९

---

४५४

१ देणे तामसीभट याचे स्त्रीस नथ जडाव मोत्याची रासकर्दन-पैकी किमत रुपये १६००

शहत.

२ मोत्ये जोडी

१ माणिकमणी

---

३

२ देणे रामशास्त्री याचे स्त्रीस कंगण्या मोत्याच्या रासकर्दन पौ घाट सोने वरी मोत्ये

१९२ मोजदाद

७ कमी मोजदाद सईन (?)

---

१९९

२ देणे बालकृष्ण शास्त्री याचे स्त्रीस कगण्या जडाव हिऱ्याच्या रासकर्दनपैकी याो
हिरे शाा
४५ हिरे अष्टपैलू वगैरे दर २१
९४ हिरकण्या दर ४७
१३६

२ देणे जगोबा देव याचे स्त्रीस घोसबाल्या मोत्याच्या रासकर्दनपैकी शाा
मोत्ये
९० मोजदाद
२ कमी
९२

१ देणे बापूभट जोगलेकर यासीं आंगठी जडाव आंत गणपति· रासकर्दनपौ हिरा चौकी १

१ देणे खंडभट शालग्राम यासी आंगठी जडाव घाट साधा याो किमत ४७।। रुपये
हिरा चौकी १.

१ देणे नारायण जोसी मालवणकर यासी आंगठी जडाव घाट साधा रासकर्दनपैकी हिरा तरतरा लाहान सुमार १

१ देणे नारायणभट भांडारी यासी आंगठी जडाव रासकर्दनपैकी किमत रुपये २३।।=।। हिरकणी पान घाट १

६ प्राा आंगठ्या माणकाच्या जडाव दागिने
१ देणे परशरामभट दांडेकर यासी घाट मिनेगार माणिक चांगले सुमार १ याो
१ देणे मोरभट शालग्राम यासी रासकर्दन पौ माणिकवर्तुल १ याो
१ देणे जनार्दनभट बापट यासी रासकर्दनपैकी घाट साधा माणिकचौकी १ याो
१ देणे आयाचित नारो आपाजी याचे वाड्यातील यासी आंगठी रासकर्दनपैकी शाा
१ माणिक पानघाट
१५ हिरकण्या दांडीस
१६

5154

१ देणे जनार्दनभट खरे यासी रासकर्दनपैकी लाहान चांगली
चूण सुमार १
१ देणे त्रिंबकभट ढेरे यासी आंगठी रासकर्दनपौ चांगली
चूण १

६

१ देणे माहादेवभट कासीकर यांसी आंगठी घाट साधा रासकर्दन
पैकी पाच वर्तुल सुमार १
१ देणे दिनकरभट पुरंधरे यासीं वर्तुल तरतरा निा * *
पैकी आंगठी घाट साधा नील १
४७ प्रा दागिने कोणास दिल्हे त्याची नावनिसी लागली नाही. वा
मखलासी दागिने ४९ पौ वजा पाटल्या हिन्याच्या दुवारा
दागिने २ बाकी दागिने
२ गलेसऱ्या दागिने
१ प्रा रासकर्दन पौ किा रुपये ९६२।—
शा

२ पानडीस
१ हिरा पानघाट रुपये १९८
[ ह्यापुढील एक वंद गहाळ ]

बाल्या
पौ काढिली मोत्ये ८ यो रुपये २०० बाकी रुपये १९२९
मोत्ये ३४

२ घोसबाल्या रासकर्दनपैकी शा
१७ माणिकमणी
२६ मोत्ये दर १३

४३

२ किता बाल्या द्राक्षघोसवजा रासकर्दन पौ मोत्ये
१४ प्रा थोर
४ प्रा लाहान

१८

5155

२ प्रा किता बाल्या शहत
    ४ मोत्ये थोर वजन तोले ·।१॥·
    २ मोत्ये लाहान ०॥·॥
    —
    ६

२ प्रा किता बाल्या रासकर्दनपैकी रुपये १९१३॥ यो
    २ पाचमणी २६

[ पुढील बंद गहाळ. ]

¶*This is a list of charities given away by Ramabai, wife of the Peshwa Madhavrao Ballal, prior to her going Sati.*

---

*No. 193*] [*1776-78*

पौ छ ९ साबान
भाद्रपद मास.

श्री

शेवेसी महिपतराव कृष्ण चांदवडकर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता छ ४ सांबानपर्यंत+ सेवकाचे वर्तमान येथास्थित स्वामीचे कृपेकरून आसे विशेष. कासीतील ब्राह्मणांचीं वर्षासनें वाटायासी स्वामीनी आज्ञा केली, त्याजवरून सिध्धता सेवकाने करावयासी आरंभ केला. तो पुण्यात व चहूकडे वर्तमान जाले की, श्रीमंत कैलावासी उभयेता रावसहिवाच्या आस्ती घेऊन जातात. म्हणौन गयावल व कासीकर व गंगापुत्र प्रयागवल घरी येऊन आसीर्वाद देऊ लागले की श्रीविश्वेश्वराचे योगेकरून आमचे दैव उघडले. दक्षणेचा वगैरे बंदोबस्त चांगला करून घ्यावा. तेथे गेलीया टंटा न पडे यैसे करावे. यैसे म्हणो लागले आसता आमची पांचाची धारण वसली; गंडस्फाटणच जाले. हे गोष्टीचा आर्थ तेथे गेलियावरी फार कठिण पडतो, तो मजकूर सांगता येत नाही. येथे तरी संभूतहि[1] आस्ती घेऊन जावयाची नाही. याजकरिता माझे वस्तु तरी येकंदर जावयासी पाय घेत नाही. भाद्रपद शुध त्रयोदसीस यात्रा निघणार यास्तव स्वामीस विनंती लिंहिली आहे. दुसरा कोण्ही पाठावावयाची मर्जी आसल्यास आज्ञा करावी. आम्ही, दैवहीन ब्राह्मणाचे कार्य घडोन सेवकास यात्रा होईल, म्हणोन स्वामीस आग्रहपुरस्सर विनंती करून आज्ञा घेतली. आसे असता हे पुढे विघ्न आले. ध्यानांत न आणिता गेलो तरी प्रांत

---

\+ तारखेंत कांहीं घोटाळा आहे. १ वार्ता, वातमी.

लागावयाचा नाही. प्राणासी गाठ घालतील. पेशजी स्वामींनी कासीस पाठविले तेव्हा काही नसता आनभव आला आहे, ते स्मरण आद्याप राहिले आहे. सांप्रत आसे वर्तमान जाले असता जाण्याचा परिणाम नाही. कृपा करून राहावयाची आज्ञा करावी. शेवेसी शृत होय हे विज्ञापना.

¶*This letter gives a vivid idea of the frightful harassment which the pilgrims, in those times, suffered at the hands of the Brahmin priests of Kashi, Gaya and Prayag.*

---

*No. 194*] [*29-3-1781 ?*

पौ छ ३ राखर इहिदे.

**श्री**

**राजश्री अमृतराव स्वामीचे सेवेसी**

विनंती. उपरी, तुम्ही पत्र पाठविले ते पावले. वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामशास्त्री याणी वो माहादेवशास्त्री साठे यास पुरंधरास पाठविले आहे. निराले स्थल करून द्यावे, भोजनाचे साहित्य करून द्यावे, स्नानसंध्या करून असतील म्हणोन लिहिले आहे. व देवी श्रीमंतास आल्या ते समई याणीहि काही अनुष्टान केले आहे, येविसीचा मजकूर लिहिला तो कलला व शास्त्रीबावाचे पत्र तेथे आले होते ते पाहावयासी पाठविले ते पावले. पाहिली. मंत्रशास्त्री आहेत म्हणोन लिहिलेत; त्यास, शत्रूचे पारिपत्य होईल असे सामर्थ व्हावयाजोगे असिल्यास युक्तीने पुसावे किती रोजात इंग्रजाचे पारिपत्य होईल? असे पुसोन लिहून पाठवावे. तूर्त शास्त्रीबावानी लिहिले आहे त्याप्रमाणे त्याचे साहित्य करून द्यावे. रा छ २ राखर हे विनंती.

¶*Nana to Amritrao asking him to provide everything for Mahadeo Shastri and to enquire of him, as he is a Mantra Shastri, as to when the English would be humbled down.*

---

*No. 195*] [*12-5-1781*

पौ छ १७ जोवल

इहिदे समानीन वैशाख.

**श्री**

**राजश्री नाना स्वामीचे सेवेसी विनंती विशेष.**

आपण पत्र पाठविले ते पावले. श्रीमंताची स्वारी पुण्यास जावयासी वैशाख बहुल सप्तमी सोमवारीं आहे व जेजुरीस रविवारी श्रीमार्तंडाचे दर्शनास जाऊन यावे

---

+ पत्र नाना फडणीसाचें असे.

येविसींचा मजकूर लिहिला तो कळला. ऐशास काल कांहीं ज्वरांश जाल्याची चिठी आपणांस गेलीच आहे. आज संध्याकाली प्रकृत कसी राहात्ये हें पाहतों; त्यासारिखा जेजुरीस जावयाचा विचार. उष्णकालचे दिवस; येका दिवसांत जेजुरीस जाऊन येणें कसें होईल ? यास्तव सोमवारीं खासा स्वारी किल्याखालीं उतरली म्हणजे पंचपदी यात्रा श्रीमंताकडून जेजुरीच्या आगे करऊन विडादक्षणा येका कारकुनावरोवर देवास पाठवून प्रार्थना करावी, असा प्रकार जाल्यास वरा. उत्तर येईल त्याप्रमाणें करावयास येईल. स्वारी निघावयाचे दिवसी श्रीमंतांस कलवावे, अगोधर कळऊ नये असें पत्रीं लिहिले होते. त्यास स्वारी निघावयाचे वर्तमान कलतांच बहुत आनंद जाला. त्यांस पत्रापूर्वींच कळले. रा छ १७ जमादिलावल दीड प्रहर दिवस. या पत्राचा जाव आजच मध्यरात्र तीन प्रहरपर्यंत आला पाहिजे. बहुत काय लिहिणे, लोभ करावा, हे विनंती.

*¶Instructions are sought from Nana Fadnis regarding the Peshwa's journey to Jejuri and Poona from fort Purandar.*

---

*No. 196]* *[15-6-1782*

श्री

देवस्थाने श्री हरिहरेश्वर व ग्रामदेव श्रीवर्धन वगैरे यास राजश्री रावसाहेब याचे लग्नाची दक्षणा व वस्त्रे सुा सलास समानीन मयां व आलफ.

पोतापैकी छ ३ रजव गुा अंताजी मल्हार बाकेनीस दक्षणा रो

१ श्रीहरिहरेश्वर
१ श्रीकालभैरव
१ श्रीउतरेश्वर
१ श्रीमाहादेव
१ श्रीजीवनेश्वर
१ श्रीसोमजाई
१ श्रीकुसुंबदेवी
१ स्थानपुरुष
१ क्षेत्रपाल
१ श्रीलक्ष्मीनारायण
१ श्रीजोगेश्वरी
१ श्रीमाहालक्ष्मी
१ श्रीकालेश्वरी कारल्याची

१ श्रीजाखमाता खुजाऱ्याची
१ श्रीकालकाई मेघऱ्याची
१ श्रीभैरव दिव्याचा
—
१६

जामदारखाना पौ छ २ रजब वस्त्राबाा ताा
येसाजी रामचंद्र भातखंडे कापड आख

४०९ श्री हरिहरेश्वर येथील देवास
१७६ श्रीहरिहरेश्वर
१६४ श्रीकालभैरव
२९ श्रीजोगेश्वरी
२९ श्रीगणपति
१९ श्रीबहिरव
—
४०९

| | | |
|---|---|---|
| | ताा अदा | |
| १२० | तिवटे | ९ |
| १॥≡ | खण | १ |
| ७१ | शेले जाफरखानी | २ |
| २७८ | शेले साधे | २ |
| १७ | लुगडे | १ |
| ९३॥ | जामेवार छिटी | १ |
| ६१॥ | ताफ्ता कद | १ |
| ३९॥ | छीट बंदरी | १ |
| ७।॥÷ | खादी पाा | २८≡ |
| ४०९ | | १६८≡ |

१७९ श्रीवर्धनकर देवास
९० श्रीजीवनेश्वर
९० श्रीलक्ष्मीनारायण
२९ श्रीसोमजाई
२९ श्रीकुसुंबदेवी
२९ श्रीस्थानपुरुष
—
१७९

यास आदा सनगें १०।=

२०० पा दिवे येथील देवास

५० श्रीउतरेश्वर

२५ श्रीनागेश्वर

४० श्रीवहिरव

४० श्रीकालेश्वर मौजे कारंजे

१५ श्रीवापदेव

१५ श्रीकालजाई

१५ श्रीजाखमाता खुजारे

२००

यास आदा सनगे १२।।।÷

१२० पा म्हसाले मौजे अमृतेश्वर येथील देवास

१०० श्रीअमृतेश्वर

१० श्रीवहिरव

१० श्रीनागेश्वर

१२०

यास आदा सनगे ५।।।

९०० ४५८=

¶*A list of the deities at Harihareshwar and Shriwardhan was drawn and rich dresses were sent to their temples on the occasion of the Peshwa's marriage.*

*No. 197*] [*22-5-1788*

पौ छ १० रमजान सुा तिसा

जेष्ट

**श्रीशंकर**

श्रीमंत राजश्री नाना यांप्रति

आश्रित लक्ष्मणभट्ट कर्वे यांचे अनेक आशीर्वाद विनंती. येथील क्षेम वैशाख वद्य द्वितीयापर्यंत जाणोन अपुले कुशळ ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. मातुश्रीनी[१] आज्ञा केली की, यंदा मोठे पर्व सूर्यग्रहणासारखे आणि आमचे राशीस

१ आनंदीबाई.

आहे. तर तुळा रुप्याची करावी. त्याजवरून पूर्वी पत्र पाठविले व दुसरे पत्र पाठविले तर याचा विचार करोन पत्र पाठवावे. यंदा बाईचे पत्रिकेत मृत्युयोग आहे ऐसे आहे. व येथे सांबाचे देवघरांत सोन्याच्या मुहूर्ती तिनि आहेत, त्या उग्र आहेत यास्तव ब्राह्मणास द्याव्या ऐसे मानस आहे व भैरवीचे यंत्र ऐशी छतीस सततीस तोळे आहेत. कळावे. द्यावयाची मर्जी फार आहे अथवा पुण्यास पाठवावी व पोवळ्याचा गणपति व पाचेचे मोर पुण्यास पाठवणार आहेत. हे तव पुर्वीच विचारिले आहे. खासगत कामाची विनंती केलीच आहे. ग्रहणोत्त(र) लवकरच दर्शनास येतो. त्या मुहू(र्ती) * * न रुप्याच्या करणार आहेत. त्याची आ(ज्ञा) असावी. याद पाठविली तिचे उत्तरे पाठवावयाची आज्ञा असावी. सुज्ञांप्रति बहुत काय लिहीणे, कृपावृद्धि करावी (हा) आशीर्वाद.

¶*Lakshmanbhat Karve communicates to Nana Anandibai's desire of weighing herself against silver to appease her evil star.*

---

*No. 198*] [*8-10-1804*

**श्रीयेकनाथप्रा**

विष्णु.

**श्रीमंत माहाराज राजश्री बाबासाहेब यांसी**

प्रति रामचंद्र कृष्ण गोसावी आसीर्वाद विनंती जे. स्वामीनी सासवडचे श्रीस येक दागिना व रुपयाचे उपकर्णेकारितां त्रिंबकजी डेंगळे याजकडून रुो १००० येक हाजार सिका देविला तो आम्हास पावला. मिति आस्विन शुध ९ शके १७२६. हे आशीर्वाद.

¶*A donation by the Peshwa of Rs. 1,000 to the temple of Vishnu at Saswad is acknowledged in this letter.*

---

*No. 199*] [*28-7-1815*

**श्री**

**श्रीमंत माहाराज राजश्री**

**बाबासाहेब स्वामींचे सेवेसी**

विनंती शेवक मोरो नारायण दावक चरणावरी मस्तक ठेवून [illegible] नमस्कार विज्ञापना ऐसीज. श्रावण मासचे [illegible]

---

२ पत्र कोपरगांवाहून, [illegible]

वाडा शुक्रवार येथील ड्डा श्रावण शुा १ प्रतिपदा रविवार ताा शुा पंचमी बुधवार येकूण च्यार रोजा दररोज येक हजार प्रमाणे येकूण च्यार हजार ब्राम्हण-भोजनाचा मक्ता मी कबूल केला, त्याबदल सरकारातून पोतापैकी राजश्री जनार्दन कोंडदेव गाडगीळ याचे विद्यमाने देविले ते चांदवड रुपये २५०० अडीच हजार पावले. सुा सीत आशर मया तैन व अलफ. शके १७३७ युवानाम संवत्सरे आषाढ वाा ७ शुक्रवार. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. हस्ताक्षर रामाजी माहादेव ठोसर.

¶*Moro Narayan Dabak passes a receipt to the Peshwa for Rs. 2,500, being the sum for which the writer had undertaken to feed 4,000 Brahmins at a daily dinner during the month of Shravan.*

---

*No. 200]* *[1764*

## 9. Vows, Buildings, etc.

सुा आर्बा सितैन

### राजमंडळ

**स्वारी राजश्री पंतप्रधान**

**खर्च खेरीज मुशाहिरा**

नवस खर्च

जामदारखानापैकी

छ ३० माहे जिलकाद मुकाम पुणे विद्यमान राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस ड्डा छ १ जिलकाद ताा छ २ जिल्हेज अखेर छ ७ रोज विाा सौ पार्वतीबाई यानी श्रीबहिरी किले सिहगड यास मुखवटा सोन्याचा नेला ते समई ताा हरि विश्वनाथ भावे दुपटा १ याो

आख
८७॥'

रत्नशाळेपैकी

छ ३० माहे जिलकाद मुकाम पुणे विाा राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस ड्डा छ १ जिलकाद ताा छ ३० मिनहू देणे श्री अंबरीनाथ वास्तव्य किले सिंहीगड यास साल गुदस्ता मोगलाच्या दग्यात सेर सोन्याचा मुखवटा नवस केला तो

हालीं दिल्हा विा सौ पार्वतीबाई. पा राजश्री बालाजी जनार्दन फडणीस रसानगी
व ताा हरि विश्वनाथ भाव्ये छ ५ रोज

किंमत रु.

४२०८=

सोने ताा पैकी कब्याचे दर तोला ाा १६॥ प्रो ाा

४००८=

सोने वजन तोले

२३॥।१ मुखवटा १

।= कुडक्यास

२४।·

मोत्ये कुडक्यास सिलकी दागिन्या-पैकी रती ४ चव ४॥ किाा

ाा

२०

मोत्ये

२

¶*Parvatibai fulfils her vows to certain deities at Sinhgad fort.*

---

*No. 201*] [*1764?*

सुाा आर्बा

## राजमंडळ

स्वामी राजश्री पंतप्रधान
खर्च खाो सुाा नवस खर्च
पोतापैकी

माहे रमजान ाा

३७५ छ ४ रोज श्रीबलालेस्वरी पांच सहश्र रुपयाचे ब्राह्मणभोजन करावे त्रिंबकेस्वर सरकारात राहावा म्हणौन नवस केला होता, त्याजपैकी भोजन दक्षणेस पाठविले ताा नाथूराम प्यादा.

जामदारखानापैकी

छ २७ जमादिलाखर किले त्रिंबकेस्वर किला फते व्हावा म्हणून त्रिंबक सूर्याजी याणी देवास नवस केले होते, त्याची सनगे दिल्ही, ताा संकराजी त्रिंबक सनगे ाो

श्री मार्तंड मुकाम जेजुरी सनगे निसबत नारो आपाजी

[सनगांचा तपसील]

सुभा राणोजी बलकवडे सनगे याो ाा

३४ श्रीवाघजाई

5163

सुभा मोराजी सिंदे खदंडा सनगे रुपये
६८॥ बहिरी थल

२६ श्रीनवलाई
३१॥ वरधान सुरगड
४१। श्रीबाबदेव

| | |
|---|---|
| १३३॥= | ११ |

श्रीदेव सुभा बहिरजी वलकवडे सनगे रुपये

| | | |
|---|---|---|
| २६ | अलगाई | |
| २१।।।= | श्रीभवानी | कळसाई |
| २५ | काक्षा कावनई | |
| ७२।।।= | | ९ |

[पुढील येक बंद गहाळ.]

श्री खंडेराव बहिरी नासीकचा नि॥ गंगाधर बलाल सनगे रुपये

तेरीज येकंदर सनगे यो॥ रुपये

| | | |
|---|---|---|
| २५३।।। | श्रीमार्तंड जेजुरी | ४॥ |
| १०६ | सुभा मोरोजी सिंदे | |
| २३।= | भवानी वोतूर | |
| २९ | खंडेराव बहिरी नासीक | १॥ |
| १३३॥= | सुभा राणोजी वलकवडे | |
| ७२।।।= | सुभा बहिरजी वलकवडे | ९ |
| ६१८॥= | | ३६॥ |

¶*Clothes, etc., are given as presents to several deities promised in a vow by Trimbak Suryaji for the successful capture of the fort of Trimbakeshwar.*

सुाा सीत सबैन.

# राजमडळ

## स्वारी राजश्री पंतप्रधान

## खर्च खेरीज मुशाहिरा

छ १६ जाखर. गुाा बापूजी हरि यास कोलवणात कामगारीस पाठविले तेथे सालगुाा छ १७ रावली मौज बापवर नजीक किले गंभीरगड येथे अडचणीचे जागा कोलवलणचे स्वारीस मुकाम जाहाला होता, तेथे पर्जन्य फार लागला, सबब नवस श्रीनागेश्वर देव कसबा पुणे रुाा

१००

[कोठून द्यावयाचे याचा तपशील]

रत्नशालेपैकी

छ २९ जाखर मुाा पुणे सौ दुर्गाबाई यास देवी निघाल्या साा श्रीसीतला देवी वास्तव्य चेऊल यास सौ पार्वतीबाई याणी नवस केला होता तो राा व ताा हरि विश्वनाथ भावे सोने वाा कसर मोजदाद सबैनपैकी दर तोला रुपये १५।= प्रमाणे किंमत रुाा

१९८=॥

---

सोने वजन तोले

१ प्रतिमा देवीची १

।· द्रिष्टी २ येकूण

१।

छ ३० रमजान मुाा पुणे. रायेगड किला सरकारात फते व्हावयानिमित्य आपाजी हरि याणी देवास नवस केले होते, त्याचे दागिने करून दिल्हे वाा सनद लस्कर चिठी छ १ सवाल आर्बा सबैन. हाली रुबरू दाखऊन दिल्हे. छ ६ साबान आदा ताा आपाजी [अपूर्ण]

¶*An account of the expenditure for the fulfilment of certain vows is given in this paper.*

No. 203] [1779

# राजमंडळ

## स्वारी राजश्री पंत प्रा
## खर्च खा मुशाहिरा

सुा तिसा सबैन

नवस खर्च

पोतापैकी

माहे रावल रुा

१९६। छ २९ रोज विा राजश्री राव पेशजी कैलासवाशी मातुश्री गंगाबाई याणी देवास नवस केला होता त्यापैकी हाली रुो

१०० बहिरव वास्तव्य बहिरवाडी नजीक किले पुरंदर यास सोन्याचा मुखवटा वाहात्येसमई नख्त शंभर रुा ठेवावयाचा नवस होता त्याप्रो देवापुढे ठेविले रुा छ १३ रावल

९६। श्रीनारायण वास्तव्य नजीक पेठ किले पुरंदर यास दोन महारुद्र करावयाचा नवस होता त्याप्रा दोन माहारुद्र करविले, इा छ १४ रावल ताा छ १५ मिा दोन रोजा आभिषेक आनुष्टान जाहाले त्यास ब्राम्हण-भोजनाचे साहित्य वगैरे खरेदी गुा महिपतराव बापूजी कारकून दि॥ रामचंद्र नारायण प्राा पुणे [सामानाचा तपशील]

माहे जमादिलोवल अखेर रुा

१० छ १३ रोज नवसाचा गोंधळ छ ८ जमादिलोवली वाड्यात घातला त्यास गोंधली यास बिदाई रसानगी यादी

रत्नशालपैकी रुा

छ १८ माहे जमादिलोवल मुा पुणे इा छ ३ जिल्हेज ताा छ ९ रबिलाखर श्रीबहिरव वास्तव्य बहिरववाडी नजीक पुरंदर यास येक हजार रुपयाचे सोन्याचे मुखवट्याचा नवस केला होता तो तयार करून दिल्हा बा पत्र लस्कर ताा जिवाजी भंडारा खिजमतगार याजबरोबर पाठविला छ १२ रावल

किंमत रुा १०००

[पुढें तपशील]

5166

सुा समानीन

परभारेपैकी

छ २७ जाावल अवल श्री देव नारायण वाा मौजे टाकवली ताा हवेली प्रांत कुडाल यास साल गुदस्ता इंग्रज मुंबईकर हा दुर्बुध्धी धरून सरंजामसुधा कसबे तलेगावापर्यंत चालोन आला होता, त्याचा पराभव व्हावयानिमित्य वो राजश्री अनंतभट पित्रे वाा मौजे मजकूर याचे विद्यमाने श्रीस नवस सरकारातून केला होता, त्यास इंग्रजाचे पारपत्य श्रीकृपेकरून जाहाले सबब रसानगी यादी रुा

७००० श्रीदेवाकडे कारखान्याबाा

८॥ श्रीदेवी मावली मौजे मजकूर.

छ २७ जाावल अवल श्रीमार्तंड वास्तव्य जेजुरी यास आर्बा सबैनात नवस केला होता तो हाली राा याद रुा

५०००० श्रीमार्तंडापुढे

५०००० बाजी नारायेण व राघो नारायेण पुरंदरे सासवडकर यासी

रु. १०००००

येक लक्ष रुा तुकोजी होलकर यांजकडे प्राा मालवा येथील बाबती सरदेशमुखीचा ऐवज मागील तीसाल येणे त्यापौ देविले रुा

५७७५० पांडुरंग नारायेण भुसकुटे याणी हवाला घेतला आहे त्यप्रो श्रावण शुा १ देविले

४२२५० आबाजी नाा वानवले याणी हवाला घेतला आहे त्यापौ जेष्ट शुा १५ देविले.

१०००००

सदरहू ऐवज हरि बलाल याजकडे पावता [अपूर्ण]

¶*These are account sheets showing the expenses incurred for the fulfilment of certain vows made to deities from time to time. Amongst these is a vow for the success against the English at Talegaon.*

---

*No. 204*] [*23-11-1769*

पौा छ ३ रमजान सबैन.

**श्री**

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बालाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी**

पो माधवराव बलाल प्रधान नमस्कार विनंती. उपरी, येथील कुशल जाणून स्वकील कुशल लिहीत जाणें विशेष. माहादारेतून धामणीकर वाणी याणें

5167

बाजार व पेठ व गांव माखजन ता संगमेश्वर येथील वाणी उदमी वगैरे लोक याजवरी भुतें घालोन घराची घरें गुरेंसुधा मारिली आहेत म्हणौन विदित जालें. यैशियास, वाणीमजकुराने भुते घालोन गुरे माणसे मारिली वगैरे उपद्रव भुतासंबंधें जाला आहे, त्याची चौकसी करावयाविसी सुभा रत्नागिरीस लेहून पाठऊन बाजारची रयेत वगैरे ज्यास उपद्रव जाला असेल त्यास आणून चौकसी करणें. सदरहूप्रमाणें खरें जाहाल्यास भुताल्याचे पारपत्य करून गुन्हेगारी सरकारात घेणे. ही पुर्ती चौकसी होऊन फडशा होये तोपर्यंत वाणी मजकुरास सरकारातून नवे वतन करून घावयाची याद देण्याची जाहाली आहे, ती पत्रें करून न देणे. जाणिजे. छ २२ रजब सुा सबैन मया व अलफ. . बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*The Peshwa orders Nana Fadnis to institute inquiries regarding a certain grocer who is alleged to have demolished houses and cattle, belonging to other traders, by invoking the aid of evil spirits. The Peshwa moreover adds that the grocer, in case he is proved guilty, should be duly punished.*

---

*No. 205]* *[30-7-1770*

श्री

सेवेसी विज्ञापना. स्वामीनी पत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं "ब्राम्हणाचीं लग्नें कार्तिकमासीं व भ्रतार मृत्य पावलियावर स्त्रियानी दतपुत्र घेणे या दोही गोष्टींची रूढ स्वदेशी नसतां रत्नागिरि तालुकेयांत बालाजी गणेश यांचें लग्न कार्तिक मासीं जाहालें व दिनकर माहादेव यांचे सुनेनें दतपुत्र घेतला, याजवरून तेथील अमलदारास काय म्हणावें ? कदाचित् संकटविषयास्तव म्हणतील तरी कोणते संकट हे सरकारात लेहून हुजूरचे आज्ञेने कर्तव्य ते करावें ते गोष्ट न जाली. परंतु कांहीं शास्त्रसंमत आहे यास्तव फिरवितां न ये. तथापि ज्या देशीं जी रूढ नाही ते गोष्ट सरकारचे आज्ञेसिवाये व्हावयासी कारण काये ? याउपरी तेथील तालुकदारांस लेहून अतःपर याप्रो न होये ऐसा बंदोबस्त करून वर्तमान सरकारांत लेहून पाठवावे" म्हणौन आज्ञा. ऐशास आज्ञेप्रो तालुकदारास लेहून येविसींचा बंदोबस्त करवितों. रा छ ७ राखर इहिदे सबैन हे विज्ञापना.

¶*Orders are issued prohibiting the performance of marriages in the month of Kartik and the adoption of a son by a Brahmin widow, without previous permission from Government.*

5168

No. 206] [5-1-1772

पौ छ ७ सवाल सन
इसने सबैन पौष.

श्री

शेवेसी रामचंद्र नारायेण गोरे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल ता। छ २९ माहे रमजान मुकाम गंगापूर येथास्थित जाणून स्वकीयें कुशल लिहीत जावें विशेष. समुद्रतीरी व देशामध्यें कितिका स्थली कन्येचा विक्रये करून द्रव्य घेत आहेत. याप्रमाणें आनाचार प्रवृत्त जाला आहे. यास श्रीमंतासारिखे ब्राम्हण प्रभु असतां व तुम्हासारिखे ज्ञाते सनमार्गवर्ती विवेकी मंत्री असतां हा मार्ग अनुचित, योग्य नव्हे. त्यास ह्याअर्थी श्रीमंतास विनंती करून याचा बंदोबस्त करावा. या बंदोबस्ताविशई पेशजी दोनतीन वेल उपक्रम होऊन देशोदेसी सरकारची पत्रे व कारकून प्यादे गेले. परंतु बंदोबस्त न जाला. तरी असा मजकूर कामाचा नाही. हाली श्रीमंतांच्या चितात येथास्थित अनाच्यार राज्यात प्रवृत्त बहुत जाला असे समजाऊन देशोदेसी सरकारची पत्रें व चौकसीस परनिष्ट कारकून चांगले शाहाणे माणूस असे नेमून क्षेपनिक्षेप बंदोबस्त करावा. बंदोबस्त कसा होईल म्हणाल तरी, पेशजी श्रीमंत राजश्री भाऊसाहेब याणी मद्याचा बंदोबस्त केला तो हा कालपर्यंत उतम प्रकारें चालला आहे. याच प्रकारे हा केल्यास होईल. परंतु मनामध्यें हे कार्य करूच असे धरून केल्यास होईल. ज्याणे कन्येचा विक्रये करून द्रव्य घेतले असे चौकसीत आढलल्यास परिछिन्न त्याजपासून राजदंड घेऊन वाली घालावें व मध्ये अंत्यस्थ चौकसदार व हरकोणी घऊन करितील त्याचा बंदोबस्त हुजुरूनच असावा. व नानाप्रकारें श्रीमंतास समजाऊन रदबदली करितील त्यांचे परिछिन्न येकंदर आइको नये. यैसे केल्याने प्रभूचें येश बहुत होईल. याप्रमाणें आपणास लिहोन पाठवावयास श्रीमंत मातुश्री बाईसाहेबाची आज्ञा जाली. त्यावरून लिहोन पाठविले आहे. कलावें. बहुत काय लिहिणे हे विनंती.

¶*Gopikabai communicates her desire to Nana Fadnis that the Peshwa should be induced to enforce strict prohibition of the practice, then prevalent, of selling away brides, in marriage, by their parents or guardians, in the same way that Sadashivrao Bhau adopted in the case of liquor traffic.*

---

No. 207] [21-9-1772

तालीक

श्री

**वेदशास्त्रसंपन्न राजश्री पाठकजी यांसीं**

विनंती उपरी. सूर्यनारायेणभट तेलंग याणे राही ब्राह्मण इजपासी पेशजी बदकर्म केले त्याचा मुदा खरा जाला, त्याजवरून याजला तीर्थे करावयाची आज्ञा

जाली होती. त्यास सात आठ वर्षे जाली. हाली तीर्थाटणे करून आला आहे म्हणून रा। केशवराव बलाल याणी लिहिले त्यावरून आपणास लिहिले आहे. सूर्यनारायणभट यास शास्त्रता प्रायश्चित्त देऊन शुद्ध करावा.

ता। छ २३ जमादिलाखर सुा। सलास सबैन मया आल्फ. वहुत काय लिहिणे ?

*¶Shastri Pathakji is asked to take back into caste Surya Narayan, a Telang Brahmin, who had been punished for adultery.*

---

*No. 208]* *[21-5-1764*

पो। छ २८ जिलकाद खमस
वैशाख बा। सांडणीस्वार.

श्री

पुा। राजश्री बालाजी जनार्दन
स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. पर्वतीचे तल्याचे बागातील बंगला आहे त्यास इमारत जलून भिंती मात्र उभ्या राहिल्या आहेत त्या वाईट दिसतात, यास्तव त्या भिंती पाडून इटा जमा करून ठेवणे आणि जागा हमवार करणे. जुने जोते राहील त्याजवरी चौमोली छपरबंदी बंगला करणे. आत झाडे आहेत त्यास आली बांधून पाणी लाऊन गुलजार करवणें. नीरेचा पूल व पुण्यातील पूल व कलसचा पूल दागदोजी करावयास जाले असतील त्याचा समाचार घेऊन भंगले खचले असेल त्याजवर भटीची माती घालून दुरुस्त करणे. वरचेवरी समाचार घेतल्याने जाया होणार नाहीं याजकरिता लिहिले असे. तरी पर्जन्यापूर्वीच हे काम करवणें. श्रीविष्णूची मुहूर्ते वगैरे मुहूर्ती तयार जाहाल्या असिल्या तरी वो। राजश्री गंगाधर-भट कर्वे यास मुहूर्त पुसोन स्थापना करवणें. कितेक पर्जन्यकालची कार्ये जरूर करावयाची असतील ती तुम्ही केलीच असतील. राहिली असिली तरी ती करवणे रा। छ १९ जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती.

*¶The Peshwa orders Nana Fadnis from his camp in the Karnatak, to rebuild the bungalow at the Parbati tank, to repair before the rains certain water channels and bridges and to install the images at the Parbati hill, if they be ready. The paper shews how minutely the Peshwa attended to his duty all round.*

No. 209]

**श्रीगजानन**

राजश्री सदासिव भिकाजी व हरि भगवंत गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो त्रिंबकजी पाटील डेंगले रामराम विनंती. उपरी, सरकारवाडा शुक्रवार येथे गची नवी करावयाबद्दल राजश्री रामचंद्रपंत अणा नगरकर व चिंतोपंत रावजी देशमुख व जनार्दन नारायण देशपांडे व चिमणाजी नारायण व आबा बाम व आम्ही इतक्याचे हवाली रुपये ६००० साहा हजार सरकारातून करविले ते रुपये अणा नगरकर याचे हवाली सदरहूचे विद्यमाने करून आपलेकडील जामदार व कामाचे चौकसीवर नेमून देऊन गचीचे काम सरकारमर्जीप्रमाणें होय तें करावें. सदरहू साहा हजारपैकीं नगरकर यांजकडे पेशजी ऐवज जो दिल्हा असेल तो मजुरा धरून बाकी ऐवज निवेल तो द्यावा. पावती येथे घेऊन यादीवर मखलासी जाली आहे. त्यास आपलेकडील कोणी शहाणा माणूस नेमून देऊन गचीचे कामाची चौकशी ठेवावी आणि ऐवज लिा प्रमाणें भरणा करावा. येमा वनकर याजकडे आंब्याचे पन्हेऱ्याबदल अडतीस हजार रुपये द्यावे म्हणोन लिहून पाठविले आहे त्याप्रमाणे तुम्ही वनकर याजकडे भरणा करून पावती घेऊन पाठऊन देणे. कोलते यार्णी आडतिसा पैकीं भरणा केला असेल याची चौकशी करून लिहून पाठवावे त्याप्रमाणें विनंती सरकारांत करूं. आज्ञा होईल तसे लिहूं. कोलते याजकडून सा हजार सिका निकडीने घ्यावा. चांदवड रुपये घ्यावयाची आज्ञा नाहीं. कलवि. रा छ २३ रजब. बहुत काय लिा हे विनंती.

ताजा कलम: साहासे लोक पायदल पुणे मुा थोरले वाड्याचे रखवालीस व च्यारसे लोक पेलघाटास पाठवावयास येकूण हजार ठेवावयाची आज्ञा जाहली. तुम्हास कलावें हे विनंती.

¶*Trimbakji Dengle writes to Sadashiv Bhikaji and Hari Bhagvant about the work of building a new terrace to the Peshwa's palace in Shukrawar Peth.*

---

No. 210] [26-3-1807

**श्री**

श्रीमंत राजश्री बाबासाहेब
साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक मनसाराम लक्ष्मुमण व दाजी सुतार विनंती विज्ञापना ऐसीजे कीं, विश्रामबागेंतील इमारतीचें काम आम्ही कबूल केले त्याचीं कलमें तपसील:

२९००० पूर्वेकडील रस्त्याचे अंगे सोपा दुधाई उत्तरदक्षण खण दक्षणेकडे चापेखण दोन व उत्तरेकडे चापेखण येक

तुळई यास आच पोचली. नंतर बंब आणून पाण्याचा पुरावा चोहीकडून केला त्याणे आग दरोबस्त विझली. इतक्यात रा बापू गोखले व देशमुख व भाऊकडील कारकून वगैर मंडली येऊन पोहोचली. नाश मोठाच व्हावा परंतु श्रीमंत राजश्री माहाराज स्वामीचेच पुण्यप्रतापे काहीं येक नाश न होता आग विझोन वाड्याचा बच्याव जाहाला. खोलीतील जवाहीर वगैरे जिनस वरचेवर बाहेर काढून ढका न पोचता बंदोबस्ताने ठेविला. खोलीवरील पेंड दरोबस्त खणोन काढून जागा मोकली केली. पेंड काढावयाचे कारण तुलई अगर कडीत आग राहील या अंदेशाने पेंड दरोबस्त काढून तुळ्यावर पाणी घालून संशये निवृत केला. अग्नीची गडबड व्हावयाचे पूर्वी सहज श्रीमंत आपासाहेब याची स्वारी बाहेर गेली होती. हे वर्तमान बाहेर समजल्यावर रा बापू जेठी याचे घरी आग विझे तोपर्यंत होते. अग्नि शांत जाहाल्याची बातमी गेल्यावर स्वारी वाड्यात आली. गोखले व भाऊकडील कारकून सातघटका रात्र जाहाल्यावर निघोन गेले. अग्न लागल्याची बातमी बाहेर गेल्यावर शहरातील तमासगीर वगैरे दिली दरवाज्याबाहेर मइदानात बहुत जमा जाहाले, त्याजमुले दर्वाजा लाऊन बंदोबस्त करून दिंडी मोकली राखली, याजमुले गलबल होऊ पावली नाही. आत लोक आले होते त्यांचा झाडा झडती चौकसीने बाहेर लाऊन वाड्यातील बंदोबस्त करून रघुनाथ यास वाड्यात ठेऊन मी आताच घरी आलो. उदईक सविस्तर तपसीलवार चौकसी करून लिहितो. येविसीची सूचना आगाव अग्न विझताच लिहिली आहे हे विज्ञापना.

¶*An account of a fire at the Shanwarwada and measures taken to extinguish it is given in this letter.*

---

*No. 216]* *[4-4-1808*

श्री

शेवेसी विज्ञापना विशेष. आज सोमवार इंदुवार साइंकाली दिवालागणीस सिरस्त्याप्रमाणे कारखान्यात दिवावत्तीची वात लाविली, कुलुप घातले, नंतर पाव घटिकेचे अवकाशे आंतून किंचित् धुराचा संशय आला, तेव्हां कुलुप काढिलें तों धुराची गर्दी फार जाहाली. त्यात उड्या घालून कागदपत्र वगैरे बहुत करून दरोबस्त काढिले त्याची बंदोबस्ती बहुत करून राखिला. बंब वगैरे लाऊन आग विझविली. वरचे खोलीत माडीवर जिनस वगैरे होता तो दिवाणखान्यात काढून तेथे पाहारे आपटे व चौधरी याजकडील बसविले आहेत. वरचे खोलीत कडीपाट खोलीवरील फोडून तुळईस आग लागलेली विझविली. अद्यापि पाण्याचा उद्योग चालताच आहे. श्रीमंताचे

ते सापडले. खोलीचे तळाची माती खरवडून काढून झारेकरी याजकडून धुवविली. त्यात काही पाच च्यार खोटे खडे व सोन्याचे व रुप्याचे रज सांपडले. जालेला मा॥र लि॥ आहे. काही उंदराचा संभव होतो असें इंदुवारचे पत्रात लि॥ आहे असें वाटतें, परंतु तो संदर्भ मिळत नाहीं. कारखान्यांत नेहमी समई लावावयाची तिचे तोंडावर ठेवावयासी दगड तासीव मेजाचा मुदाम केलेला आहे, त्यातून वात जाईल असा काही भास होत नाही, मम ईश्वरचरित्र काय असेल तें नकले. समई दरवाज्याचे तोंडीं असत्ये तेथून पंधरा हातावर संपर्क जाहाला. कडीपाटाचे खाली वितीदीडवितीवर फळ्या मारिलेल्या आहेत, त्यांजवर बुर्दी पेटारे होते त्यास प्रथम संपर्क होऊन मग कडीपाटास व तुळईस संपर्क जाला. त्याचे खालील फळ्यावर आणखी पेटारे आत कापूस व त्याखाली सनगाची बासने वगैरे होतीं त्यांस काही उपद्रव जाला नाही. कळावयाकारिता लि॥ आहे. इंदुवारचें पत्र पा॥ तें पावले व रा॥ विनायकपंत आणा बाव याचे नांवे छतीसशे रु॥ची चिठी पा॥ ती पावली. चिठीप्रो ऐवज आणून घेतों. दागिने करण्याविसी दुसरे पत्र आले म्हा॥ सोने खा॥ करून दागिने करावयासी लाऊ. इंदुवारीं येथील मा॥राचे पत्र पा॥ त्याचे उतर ही वेळ पावेतो नाही. त्याजवरून चिंता ला॥ आहे. कळावे शेवेसी श्रु॥ हो. रा॥ शु॥ ११ गुरुवार अस्तमान. हे विज्ञापना.

¶*An attempt is made in this letter to account for the fire at Shanwarwada.*

---

*No. 219]* *[8-4-1808*

**श्री**

विज्ञापना विशेष. आपण छ ९ सफर बुधवार साईकालचे पत्र पाठविलें ते भृगुवारी तिसरे प्रहरी पावले, मा॥र समजला. सारांश कचा मजकूर जाहाला त्याचा तपसील लिहून पाठवावा म्हणोन लि॥, त्यास कचे मजकुरी पत्रे भोमवार व गुरुवार ऐसी दोन पा॥ आहेत त्याजवरून मजकूर कळेल. खोलीचे कवाड उघडिले ते वेळेस तेव्हा दिवा सजीव होता किंवा नाही एविसीचे लिहावे म्हणोन लि॥. त्यास कवाड उघडून काकड पेटऊन आत नेले ते आत जाताच विझालें. नंतर मशाल आली तोहि मा॥र त्या अन्वयेच जाहाला. समईवरील वात पाहावी तरी गलवलीत समई बाहेर आली त्यामुळे वात पाहाण्याचा विच्यार जाहाला नाही. अग्नीमुळें तसविरा व च्यार पाच आरसे जाया जाहाले तो मा॥र पेशजींचे पत्री लि॥ आहे. कळावे. ही गोष्ट जाहाल्यामुळे सरकारात तोंड दाखवावयासी जागा राहिला नाही म्हणौन पत्री, त्यास या गोष्टीस इलाज काय आहे? ते समई मेहनत श्रम केले आहेत ते ईश्वरास ठाऊक आहेत. दोन तुळयाचे कोपरे तीन

तीन हात अजमासे दोन दोन तसू जळालेल्या आहेत व दाहा कड्या जळाल्या. त्यास तुळयास खाचा घेऊन लफे बसविले असतां काम चालेल व कड्या नी दुसऱ्या घालाव्याच लागतील. येविसीचे उतर येईल त्याप्रां करू. दुसऱ्या तुळ्या घालूं म्हटले असता बहुत प्रयत्न लागेल. आपलेकडून मार कानावर पडोन उतर येईल तेव्हा चित्त स्वस्त होईल. कलावे बहुत काय लिा. मिा छ ११ सफर भृगुवासर प्रहर रात्र. पत्राची उत्तरे वरचेवर आली पाहिजेत. मुख्य गोष्ट श्रीहरीने पार पाडिले. लौकरच समजले यामुळे इतक्या गोष्टी जाल्या, नाही पेक्षा विच्यार कठिणच होता. श्रीमंताचे पुण्य समर्थ. तदनन्तर लवकर समजोन निर्विघ्न जाले. कलावे श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The fire at Shanwarwada is further described.*

---

*No. 220*] [*13-4-1808*

श्री

विज्ञापना ताा छ १६ सफर पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. जवाहीर-खान्याचे खोलीच्या जाल्या तोडिल्या होत्या, त्या नव्या करून बसवावयासी शुक्रवारचे वाड्याकडील कारखान्यातील सुतार च्यार आसामी आणिले आहेत. जाल्याचे काम चालले आहे. तुळयास लफे मारावयाचा मार पेशजी लिा आहे त्याचे उतर यावे. तुळया अजीच काढून दुसऱ्या घालावयाचा विचार असल्यास मग लफे मारावयाचे कारण नाही. त्यास येविसीची विनंति करून उतर यावे त्याप्रां काम चालऊ. रुजुवातीचे काम चालविले आहे. आलीकडे दोन दिवस पत्र आले नाही, त्याजवरून चित स्वस्थ नाही तर सविस्तर लिहावे. आलीकडे शरीरप्रकृत कसी आहे ते काहीच कलो येत नाही, तरी लिा पाा. कलावे बहुत काय लिा. श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Repairs of the Shanwarwada due to damage by fire are suggested in this letter.*

---

*No. 221*]

श्री

सेवेसी पर्शराम खंडेराव राहातेकर चरणी निरंतर मस्तक ठेऊन साा नमस्कार विज्ञापना. ताा छ ७ सफर इंदुवारी रात्री सरकारचे जवाहिरखान्यात थोरले वाड्यात साईंकाळी अग्नीचा उपद्रव जाहाला. धूर दिष्टीस पडताच कारकून मंडळी होती त्याणी व शेवकानी आतील कागदपत्र व जवाहीर वगैरे दरोबस्त

काढून वाहेर सोप्यांत ठेऊन चौकी प्राहान्याचा वंदोवस्त राजश्री वापू गोखले व आपटे व चौधरी याजकडील पाहारे आहेत व त्याणी आगहि विझवावयाची जलदी केली. सारांष इमारत फार जळाली नाही. लौकरच विझविली. महाराजाचे पुण्यप्रतापेकरून सारे निभाले आहे; परंतु पाण्याने कागद वगैरे भिजले आहेत, त्याचाहि वंदोवस्त, उदैक करितो. सविस्तर मजकुर राजश्री आपाजीपंत आगाशे यांस लिा आहे हे विनंती करतील. शेवेसी शृत व्हावे हे विज्ञापना.

¶*How the fire at Shanwarwada was brought under control is described in this letter.*

---

*No. 222*]

श्री

वडिलांचे शेवेसी आपत्ये जनार्दनाने दोनी कर जोडून सिर सां नमस्कार विज्ञापना. ताा छ ७ सफर रोज इंदुवार प्रहरसात्र सुखरूप असो विशेष. आज अस्तमान होऊन घटका दीडघटका रात्रीचे सुमारे शनवारचे वाड्यातील जवाहिरखान्यासच अग्निप्रवेश जाहाला. तेच वेळेस श्रीमंत राजश्री भाऊसाहेव व वापूसाहेव गोखले व देशमुख व वालाजीपंत दादा गोखले यांस जलद वरद्या कळऊन शुक्रवारचे वाड्यापुढील वंव जमा करून वापूसाहेव खासे वाड्यांत येऊन अग्नीचे शांतवन जाहाले. कोणत्या योगेकडून अगर फ़शाने लागली याचे कारण पकेपणे समजत नाही. कारण वाड्यांत मनुष्यहिं फार गेले आहे. सवव दरवाज्यावर जाणे येणेची वंदी जाहाली यामुळे तसनस काय जाहाला याची पकी वातमी कलत नाही. हा वेलपर्यंत जाहला माार लिहिला आहे. च्यार घटकांनी मनुष्य वाड्यावाहेर झाडे घेऊन निर्वान गेल्यावर यथंभुत माार लिहितो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*How the fire at Shanwarwada was extinguished is fur[illegible] explained herein.*

---

*No. 223*] *[1808*

श्री

विज्ञापना विशेष. आपण छ १० सफर गुरुवारचे पत्र पाठविले ते पावले. लिा माार कलला. त्यास आपण लिा मजकुराची पत्रें पेशजी पाठविली आहेत त्याजवरून सविस्तर मजकूर कळो आलाच असेल. हांलीचें पत्रीं रजुवातीचे काम सुभेदार यास वोलाऊन त्याचे व तुमचे विचारे जामदार यास घेऊन चालवावे म्हाा लिा. त्याप्रो रजुवातीचे काम चालवितों. ते वेळचे गलवलीत

अस्तावस्त जाहाले असेल न कले, असे येथून लिा होते. त्याचे उतर आजचे पत्री आले जे, कारखान्यात परकी माणूस तुम्ही येऊ दिल्हेच नसेल. जातीनसीच कारभार केला असेल. त्यास ते वेळचा प्रसंग होता तो पत्री लिहिता येत नाही. कोणत्याहि विचारे बाहेर निघो असे जाहाले होते. त्यातहि बंदोबस्ती राखावयाचे तऱ्हेने राखलीच होती. त्यात कोणी गफलत केली असल्यास झाडून रुजुवात केल्याखेरीज समजावयाची नाही. कळावे. संशय आला असेल तो दूर करून उतर पाठवावे म्हा लिहिले, त्यास रुजुवातीचे काम उदईक चालवितो. निकड करण्यास काही कमी करीत नाहीं. परंतु काही अवकाश पाहिजे. आपा, वेळ मोठी कठिण आली होती. समजावयास अणखी पाव घटिका जात असती म्हणजे विच्यार मोठा कठिण होता. या समई श्रींनी आपणास यश मोठेच दिल्हे. रुमालाच्या पेटारा अग्न लागली त्याचे खालीच होता तो काढावयास क्षणमात्र अवकाश जाला असता म्हणजे तोहि निश्चत नवता, परंतु तोहि अगोधरच निघाला. सारांश प्रसंग पार पडला. नाही पेक्षा उभे राहावयास जागा नवती. ते समई धुळेच्या (?) वगैर वाखे जाले ते काही पत्री लिहिता येत नाही. ते दुःख येथे कोणास सांगावयाचे? दुःख पोटात सिरले आहे ते काढून अमृत घालावयाचे दुसरे कोणाकडेस आहे? मिा छ १२ सफर मंदवासर प्रहररात्र शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना. रामजी पाटीलहि तेच वेळेस येऊन पोचले. हा जामदार यांचे रामराम, सविस्तर उभयतानी लिा आहे, त्याजवरून कळेल. कळावे हे विनंती.

¶*The fire at Shanwarwada and the consequent trouble are mentioned herein.*

---

*No. 224*] **11. Bajirao II—Palaces and Gardens.** [*20-8-1816*

**श्री**

**राजश्री वापूजीपंत वापू गोडबोले**
**व वालाजीपंत दादा जोगलेकर**
**गोसावी यासी**

श्नो राणोजी बिन सटवाजी फुले हाली वस्ती काो पुणे. सुा सबा असर मया तेन व अलफ ऐसीजे. सरकारातून श्रीगणपतीचे उछाहानिमित फुलाचे काम आपणाकडे सांगितले ते मी कबूल करून आलाहिदा कबुलात निभावणीची लिहून दिल्ही आहे, त्यासमधे ऐवजाचा ठराव :

मंडळी १ त्यासमधे स्वामीत्वाचा ठराव रुपये १९० दीडशे केला असे.

कलम १

१ सदरहू कारखान्याची निभावणी जाहल्यांवर माळी याचे हिशेव होऊन दरोन दीडशे रुपयांवर कसर जाजती येईल त्यांत खर्चवेच वजा करून वाकी राहील ती निमे आमची व निमे आपली. दीडशे रुपयात तोटा आल्यास आम्ही मजुरा मावणार नाहीं.

कलम

सदरहू लिहिल्याप्रा। वर्तणूक करू. हे लिहून दिल्हे सही. मिति श्रावण त्रा। १२ शके १७३८ धातानाम संवत्सरे हे विनंती.

हस्ताक्षर वापूजी गणेश अभ्यंकर.

¶*This is a contract made with a gardener for supplying flowers during the Ganpati festival at the Peshwa's palace at Poona.*

---

*No. 225*] [*1813*

श्री

यादी फळ मेवा व फुलझाडे हरजिनसी वाग वंगला सुा। आर्वा अशर मयातैन व अलफ. खरिदी अवरंगावाद व पुणे

किता.

४९७ कौली संतेरी
४० शेव
१०२ सुपारी
१४२ दालिंवी
२०९ द्राक्षी
१०० अंजीर
२९७ पेरू
६ कोटे मेवा
३३६ कोटे शेवती
८२१ मोतिया
२०० गुलाव
३७२ वेलिया
९७ जुई
१७०० पिवळी जाई १७००
६७८ पांढरी जाई
5182

२००० पोपये
१५०० हदगा
१००० कन्हेर
४५००

१ गुलछवू वजन पल्ले ५ पाच तख्ते लाहान मोठे सुमार १२
१ कलगा व मखमल तख्ते सुमार ८
१ वाड जासुंदीची लांवी गज सुमार ६००
१ गुलदावरी व गुलटोप याचा हाशा लांवी गज ६००
१ इपकपेचाची ताटी लांवी गज २००

३९८ मदन बाण
१६ बेल
९ गुलपरी
७ कुंद
२९ सोनचाफा
१६ तरगर गेंदा
६ तबिमी (?)
२९ अगर
२९ वटमोगरा
१८ रामफल
९ पारिज्यातक
२०० किरकोल
१ दवणा मर्वा
१ तुलसी
१ पाच

६९४९

जुनी झाडे.

७१ आंबे
३ खिरण्या
१ सिरसी
६४ पेरू ६४
१ चिंच
१ शेवगा
२ कौठ
१ गोधनी
१ अश्वत्थ

२ चंदन
२७ गुलाब
८६ मोगरा
६ जुई
२ जाई
१ आवळी
१ नारळी

तपसील मालीयाचा दरमाहा रुपये
१००
१० कारकून
१० दरोगा
१० माल्याचा नाईक
७० माळी आा १४
दरमाहा ५ प्रो सो

१००

१ पिंपरी
१ रामफळ
१ पडवळ
९ पारिजातक
८ वकोळी

२८४

¶*This is a list of trees and plants purchased at Poona and Aurangabad for the garden of the Peshwa in 1813.*

---

*No. 226]* *[16-4-1815*

**श्री**

श्रीमंत माहाराज राजश्री बाबासाहेब
साहेबाचे शेवेसी

आज्ञाधारक जिवाजी बिन कृष्णाजी भुतकर विज्ञापना ऐसीजे. सरकारचे वाड्यांतील रोशनाईचा मख्ता
रुपये

२७९ वाडा थोरला
६० वाडा विश्रामबाग
१४० वाडा शुक्रवार

४७९

येकूण च्यारशे पंचाहातर रुपये दरमाहा मख्ता माहे जोवळ चैत्रमासापासून तिन्ही वाड्यात ज्या ज्या ठिकाणी दीप लावावयाचे त्या जागां दीप लाऊन. त्याखेरीज काही जागां दीप लावावयाचे राहात असल्यास तेथेहि दीप लावीत जाऊ. चिराख दाने थोरले वाड्यात दोन जागा चौगिर्दी लागतात ती लाऊ. रोशनाईसमंधी तेल व रुई व कापूस व दीप लावणार ब्राम्हण याचा रोजमरा वगैरे खर्च बिलकूल लागेल तो मख्ता करार केला. त्याप्रमाणे तीन वाड्यातील रोशनाईचा बंदोबस्त राखून निभावणी बारा महिने करीन; अंतर पडू देणार नाही. मिा चैत्र शुा ७ शके १७३७ युवानाम संवत्छरे सन खमस अशर मया तेन. शेवसी श्रुत होय हे विज्ञापना. बारमाही मख्ता कबूल केला आहे. त्यास बारा महिन्यांपुढे या कामावर दुसरा कोणी (न) जहाल्यास याच करारा प्रो आम्ही पुढें चालऊ. मिती मजकूर. हास्ताक्षर खुद.

¶*This is a contract for supplying lights in the Peshwa's palaces at Poona undertaken by Jivaji Krishnaji Bhutker.*

5184

No. 227] [19-8-1807

श्री

शेवेसी त्रिंबकजी डेंगला चरणावरी मस्तक ठेऊन दंडवत विज्ञापना ऐसीजे. विश्रामबागेतील इमारत हाली जाहाली आहे त्या मागील इमारत नवी करावयाची ती स्वामीनी शेवकास करावयासी आज्ञा केली. त्यास इमारतीचे काम येणेप्रमाणे :—

१ दक्षणेकडील सोपा येकघई दोन मजले करून वर कवलार. भिंतीजवळ डोकीपेक्षा वीतभर उंच याप्रो व दोन मजल्याची पटाई सुधा करून देऊ. कलम.

१ उतरेची भिंत साधी मागील भिंतीप्रमाणे करू तिकडे सोपा नाही * * * *

१ पाये * * * * * प्रमाणे खांदून पाण्यात पुरुषभर दगड टाकून भरीत वर आणू. कलम.

३

१ मधील वर तिघई दोन मजले, दुसरे मजल्यात दिवाणखाना करून वर गची करू. कलम.

१ पश्चमेचा सोपा येकघई दुमजला कडीपाठ सुधा करून वरती कवलार भिंतीजवल डोकीपेक्षा वीतभर उंच याप्रमाणे करू. कलम.

१ फरस चौकातील तालीमखान्याजवळ फरस आहे त्याप्रो करू व मो * करून देऊ

३

कलमे ६

सदरहूप्रमाणे काम करून देऊ. याचा मख्ता ७५००० रुपये. पंचाहातर हजार चांदवड जाहाला ते रुा घेऊन इमारतीस लाऊन इमारत तयार करून देईन. मुदत आजपासून साडे नऊ महिन्यांनी वैशाख अखेरीस काम तयार करून देईन. मिति श्रावण वद्य १ शके १७२९ प्रभवनाम संवत्छरे शेवेसी श्रुत होय हे विज्ञा *

¶*Trimbakji Dengla accepts the contract for building the Vishrambag palace for Rs. 75,000. The details of the construction are mentioned in this letter.*

# Index to Selection No. 32

## *The Private life of the Later Peshwas*

D



G



H



J



J—contd.



K



L



M

## M—contd.



## N



## P



## R

तुळई यास आच पोचली. नंतर बंब आणून पाण्याचा पुरावा चोहीकडून केला त्याणे आग दरोबस्त विझली. इतक्यात रा बापू गोखले व देशमुख व भाऊकडील कारकून वगैरे मंडली येऊन पोहोचली. नाश मोठाच व्हावा परंतु श्रीमंत राजश्री माहाराज स्वामीचेच पुण्यप्रतापे काहीं येक नाश न होता आग विझोन वाड्याचा बच्याव जाहाला. खोलीतील जवाहीर वगैरे जिनस वरचेवर बाहेर काढून ढका न पोचता बंदोबस्ताने ठेविला. खोलीवरील पेंड दरोबस्त खणोन काढून जागा मोकली केली. पेंड काढावयाचे कारण तुलई अगर कडीत आग राहील या अंदेशाने पेंड दरोबस्त काढून तुळ्यावर पाणी घालून संशये निवृत केला. अग्नीची गडबड व्हावयाचे पूर्वी सहज श्रीमंत आपासाहेब याची स्वारी बाहेर गेली होती. हे वर्तमान बाहेर समजल्यावर रा बापू जेठी याचे घरी आग विझे तोपर्यंत होते. अग्नि शांत जाहाल्याची बातमी गेल्यावर स्वारी वाड्यात आली. गोखले व भाऊकडील कारकून सातघटका रात्र जाहाल्यावर निघोन गेले. अग्न लागल्याची बातमी बाहेर गेल्यावर शहरातील तमासगीर वगैरे दिली दरवाज्याबाहेर मइदानात बहुत जमा जाहाले, त्याजमुले दर्वाजा लाऊन बंदोबस्त करून दिंडी मोकली राखली, याजमुले गलबल होऊ पावली नाही. आत लोक आले होते त्यांचा झाडा झडती चौकसीने बाहेर लाऊन वाड्यातील बंदोबस्त करून रघुनाथ यास वाड्यात ठेऊन मी आताच घरी आलो. उदईक सविस्तर तपसीलवार चौकसी करून लिहितो. येविसीची सूचना आगाव अग्न विझताच लिहिली आहे हे विज्ञापना.

¶*An account of a fire at the Shanwarwada and measures taken to extinguish it is given in this letter.*

---

*No. 216]* *[4-4-1808*

श्री

शेवेसी विज्ञापना विशेष. आज सोमवार इंदुवार साइंकाली दिवालागणीस सिरस्त्याप्रमाणे कारखान्यात दिवाबत्तीची वात लाविली, कुलूप घातले, नंतर पाव घटिकेचे अवकाशे आंतून किंचित् धुराचा संशय आला, तेव्हां कुलूप काढिलें तों धुराची गर्दी फार जाहाली. त्यात उड्या घालून कागदपत्र वगैरे बहुत करून दरोबस्त काढिले त्याची बंदोबस्ती बहुत करून राखिला. बंब वगैरे लाऊन आग विझविली. वरचे खोलीत माडीवर जिनस वगैरे होता तो दिवाणखान्यात काढून तेथे पाहारे आपटे व चोघरी याजकडील बसविले आहेत. वरचे खोलीत कडीपाट खोलीवरील फोडून तुलईस आग लागलेली विझविली. अद्यापि पाण्याचा उद्योग चाललाच आहे. श्रीमंताचे

पुण्यप्रतापेकरून निर्विघ्न जाहाले. रा मिा शुा ८ इंदुवासर आवशीची प्रहर रात्र. मागाहून व्यवस्थेचा मजकूर लिहितो. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. दिव्यातील वात उंदरानें नेली असा भास होतो. मग काय चरित्र असेल ते नकले. हे विज्ञापना. येविसीचा मार रा अन्याबा सुभेदार याणी लिा आहे तेहि पत्र श्रीमंतास गावे.

¶*The fire at the Shanwarwada is further described.*

---

[5-4-1808

*No. 217*]

पो गुरुवार प्रात:काल

श्री

विज्ञापना विशेष. ता छ ८ सफर भोमवासर अस्तमान यथास्थित असे विशेष. कालचा जालेला मजकूर काल लिा आहे. आज प्रात:कालापासून जवाहीरखान्याचे लगत उत्तरेची खोलीत रुमाल होते ते काढून जागा नीट करून दरोबस्त कारखाना आत ठेविला. व्यवस्था काही पाहिली नाही. कुलुपे घातली आहेत. पुढे उतर येईल त्याप्रों कुलुपें काढून व्यवस्ता आज्ञा होईल त्याप्रा करू. कागदपत्र जवाहीर वगैरे रुपेसोने यास अग्नीचा संपर्क नाही. दक्षणेकडील आंगास पश्चिमेकडील कोपऱ्यास कडीपाटाचे खाली येक वितीवर संपर्क जाला. दोनतीन हात कटीपाट व तुळई येका आंगाने दोन तसूं जळाली. त्या कोपऱ्यास काही हरजिनसी आरसे वगैरे काही जळाले व मागील पत्रिका जुन्याचा रुमाल तेथेच होता त्यासहि काही संपर्क जाला. ऐवजाची मात्र मोजदाद केली त्यात येक पिशवीचा अजी ठिकाणा नाही. सिलक अजमासे च्यारशे रुपयेपर्यंत होते. उदईक कारखान्याचे खोलीत वरील पेंड फोडिला, त्याची माती पडली आहे त्याचा छडा उदईक काढितो. काय सापडेल ते सापडो. त्या खोलीस कुलुपे घालून ठेविले आहे. चौकसीस व मेहनतीस कोणी कमी केले नाही. यात दाटी व गलबलीमुळें काय तसनस जाली असेल ती असो. कलावे येसाजी पवार याणी सावकारी दागिने आणून दिल्हे आहेत ते खरे आहेत. कलावे. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*In the fire at Shanwarwada, says the letter, not much damage was done to property or papers.*

---

*No. 218*] [7-4-1808

श्री

विज्ञापना विशेष. इंदुवार व भोमवार दोन पत्रें दोन रोजची पावोन येथील जाहालेला मार कलो आलाच असेल. आजचा मजकूर. जवाहीरखान्याचे खोलीत वरील पेंडाची माती पडली होती ती काढली.. त्याखाली सिलकेची थैली सापडत नाही म्हा लिा होते ती सापडली व दोन दागिने रुप्याचे लाहान होते